# कीचक-वध

हें नाटक

. रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर,



ौपदी,' 'संगीत विद्याहरण,' 'संगीत स्वयंवर,' 'संगीत मानापमान'
संगीत मेनका' 'सत्त्वपरीक्षा,' 'प्रेमध्वज,' 'भाऊबंदकी,'
'बायकांचें बंड,' 'सवाई माधवराव यांचा मृत्यु,'
'कांचनगडची मोहना,' इत्यादि नाटकांचे कर्ते
यांनीं लिहिलें.

—:※:—

मुद्रक व प्रकाशक

रा. रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर,

तात्रय प्रिंटिंग प्रेस' खटाव मकनजीची वाडी गिरगांव मुंबई नं

———:※:———

(आवृत्ति दुसरी)



सन १९२६



किंमत १२ आणे

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

पहिल्या आवृत्तींत फेरफार न करतां ही दुसरी आवृत्ती छापिली असून, 'कीचक-वध' नाटकाचे प्रयोगास व पुस्तकास झालेली बंदी उठविण्याचे कामीं, प्रथम नागपुरास व नंतर मुंबईस, केलेल्या उद्योगाबद्दल, ह्या पुस्तकांत घातलेल्या चित्रांचे त्या त्या प्रसंगाचे फोटो दिल्याबद्दल, आणि 'कीचका'ची प्रथम भूमिका घेणारे प्रसिद्ध नट कै. भागवत यांच्या वेळचा नटांचा संच नाहींसा झाला असतांहि पूर्वीच्याच जोमानें व कौशल्यानें 'कीचक-वध' रंगभूमीवर आज पुन्हा त्यांच्या नेहमींच्या आस्थेनें व टापटिपीनें करीत असल्याबद्दल 'महाराष्ट्र नाटक मंडळी' व मंडळीचे मालक रा. देशपांडे व रा. दाते ह्यांचे मानावे तेवढे आभार थोडेच होणार आहेत.

'नवाकाळ' ऑफिस, मुंबई
ता. १-११-१९२६

ग्रंथकर्ता.

---

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

पांडवांचा वनवास संपल्यानंतर अज्ञातवासाचे दिवस त्यांनीं 'विराट-नगरींत' काढण्याचें ठरविलें. इतर देशांपेक्षां 'मत्स्य' देश पांडवांनीं कां पसंत केला, ह्याचें कारण विराट-पर्वाचे प्रथमाध्यायांत श्रीव्यासांनीं युधिष्ठिराचे तोंडीं येणेंप्रमाणें दिलें आहेः—"मत्स्यो विराटो बलवानभिरक्तोऽथ पांडवान्। धर्मशीलो वदान्यश्च वृद्धश्च सततं प्रियः ॥" राजा विराट पांडवांचा कैवारी म्हणजे सत्पक्षाचा अभिमानी आहे, इतकेंच नव्हे तर वृद्ध, धर्मशील, व उदारबुद्धीचा (वदान्य) आहे, असें युधिष्ठिरानें आपल्या भावांना सांगून,

मत्स्यदेशाचा आश्रय करण्याचा निश्चय केला. अशा रीतीनें उदारबुद्धीच्या विराटराजाचे छत्राखालीं असतांना राजाचे सेनापती 'कीचक' व 'अनुकीचक' ह्यांचा वध करण्याचा प्रसंग पांडवांवर कां आला? ह्या प्रश्नाचें उत्तर 'विराट-पर्वा'त शोधीत असतां मला असें आढळून आलें कीं, विराट स्वतः ह्यावेळीं 'बलवान' नसून हें विशेषण मत्स्यदेशांतील व इतर देशांतील लोक 'कीचका'मुळें त्याला लावीत असत. 'विराट' स्वतःचे राज्यांत 'कीचका'स दाबांत ठेवण्यास समर्थ नव्हता, व त्यामुळें त्याची धर्मनिष्ठा व त्याचें औदार्य एवढ्यावरच विसंबून राहून 'कीचक' व 'अनुकीचक' यांच्या त्रासापासून पांडवांचें संरक्षण होणें शक्य नव्हतें. विराट धर्मशील व वदान्य खरा, पण त्याचा अधिकार त्याच्या धर्मशीलावर किंवा उदारबुद्धीवर अवलंबून नसून 'कीचक' व 'अनुकीचक' यांजवर अवलंबून होता. ह्या विधानास 'विराट' पर्वांत खालील आधार सांपडतात. भीमसेनानें 'कीचक' व 'अनुकीचक' यांना मारल्यानंतर कौरवेश्वराचे दरबारांत मत्स्यदेशाच्या बलाबलाविषयीं वाटाघाट चालली असतां त्रिगर्तांच्या सुशर्मा राजानें दुर्योधनास उद्देशून खालील भाषण केलें:—"असकृन्मत्स्यराज्ञा मे राष्ट्रं बाधितमोजसा । प्रणेता कीचकस्तस्य बलवानभवत् पुरा ।। क्रूरोऽमर्षी स दुष्टात्मा भुवि प्रख्यातविक्रमः । निहतः सतु गंधर्वैः पापकर्मा नृशंसवान् ।। तस्मिन् विनिहते राजा हतदर्पो निराश्रयः । भविष्यति निरुत्साहो विराट इति मे मतिः ।।" त्रिगर्तांचा पराभव करणारा महाबली, अशी 'कीचका'ची मत्स्यदेशांत व आसपास ख्याति होती. 'कीचक' मारला गेल्यानंतर दुर्योधनाचे बातमीदारांनींहि 'कीचका'चें येणेंप्रमाणें वर्णन केलें आहे:—'येन त्रिगर्ता निहता बलेन महता नृप । सूतेन राज्ञा मत्स्यस्य कीचकेन पुनः पुनः ।।' 'कीचक' वधानंतर त्रिगर्तांनीं कौरवांशीं संगनमत करून मत्स्य देशावर हल्ला केला असतां 'विराटा'स त्यांना सहज जिवंत पकडून नेतां आलें, व अखेरीस धर्माज्ञेनें भीमानें त्याला सोडविलें; ह्यावरून खुद्द राजा विराटाची शक्ति किती होती, ह्याची कल्पना करतां येण्यासारखी आहे. खुद्द 'कीचका'लाहि आपल्या शक्तीची विशेष घमेंड होती, व

“ विराट ’राजाला तो सिंहासनावरील बाहुलें समजत होता. सैरंध्रीशीं बोलतांन स्वतःच्या सामर्थ्याविषयीं व विराटाचे निर्बलतेविषयीं त्यानें येणेंप्रमाणें वर्णन केलें आहेः—“ अहं हि सुभ्रु राज्यस्य कृत्स्नस्यास्य सुमध्यमे । प्रभुर्वासयितौ-चैव वीर्ये चाप्रतिमःक्षितौ ।। पृथिव्यां मत्समो नास्ति कश्चिदन्यः पुमानिह । रूप-यौवनसौभाग्यैर्भोगैश्चानुत्तमैःशुभैः ।। मयादत्तमिदं राज्यं स्वामिन्यास्मिन् शुभानने । भजस्व मां वरारोहे भुंक्ष्व भोगाननुत्तमान् ।। ” सैरंध्री बऱ्या बोलानें कबूल होत नाहीं असें पाहून कीचकानें राजा विराटाचे दरबारांत लाथ मारुन तिला खालीं पाडलें; ह्यावरून असें दिसतें कीं, कामांधतेपेक्षां आज्ञाभंगापासून उत्पन्न होणाऱ्या क्रोधाचें प्राबल्य कीचकाचे अंगीं विशेष होतें. ह्याप्रसंगीं सैरंध्रीनें विराटाची व इतर सभाजनांची अतिशय आर्जवें केलीं; पण ‘ कीचका ’चे विरुद्ध जाण्याची कोणाचीच प्राज्ञा नसल्यामुळें त्या वृद्ध, धर्मशील व उदार-बुद्धीच्या ( वदान्य ) विराटराजानें उडवाउडवीचीं उत्तरें देऊन ‘ सैरंध्री ’चा पक्ष घेण्याचें नाकारलें. धर्मराज त्यावेळीं सभेंत होता; त्यानें ह्या अपमानाचा सूड जागचेजागीं उगवावा म्हणून “शरणं ये प्रपन्नानां भवन्ति शरणार्थिनाम् । चरंति लोके प्रच्छन्नाः क्नुतेऽद्य महारथाः ।। कथं ते सूतपुत्रेण बध्यमानाम् प्रियां सतीं । मर्षयन्ति यथा क्लीबा बलवन्तोऽमितौजसः ।। ” ह्या शब्दांनीं त्याचा राग प्रदीप्त करण्याचा द्रौपदीनें विचार केला. त्यावेळीं धर्मानें सैरंध्रीस तूं ‘ अकालज्ञा ’ आहेस असें उत्तर देऊन “ मन्ये न कालं क्रोधस्य पश्यन्ति पतयस्तव । तेन त्वां नाभिधावंतिगन्धर्वाः सूर्यवर्चसः ।। ” ह्या श्लोकानें स्वतःच्या धोरणाचें आविष्करण केलें; व यथाकालीं पांडव कीचकाचा वध करून द्रौपदीच्या मनांतील हेतु तडीस नेतील, असें ध्वनित करुन त्यानें पर्यायानें लगेच तिचें शांतवन केलें. सैरंध्रीस लाथ मारून पाडल्यावर कीचकास किमपिही वाईट वाटलें नाहीं, तर उलट ‘ विराटा ’स आपण कस्पटाप्रमाणें कसें लेखतों हें सैरंध्रीनें ह्यावरून समजून घ्यावें असें त्यानें सैरंध्रीस आपल्या भाषणांत बजावून सांगितलें. त्या प्रसंगाचे श्लोक येणेंप्रमाणें आहेत.—“ सभायां पश्यतो राज्ञः पातयित्वा पदाहनम् । न चैवा लभसे त्राणमभिपन्ना

बलीयसा ॥ प्रवादेनैव मत्स्यानां राजा नाम्नाय मुच्यते । अहमेवहि मत्स्यानां राजावै वाहिनीपतिः ॥ " धर्मशील व उदारबुद्धीचा राजा विराट 'नांवाचा राजा' अशा रीतीनें ठरल्यामुळें, 'प्रख्यातविक्रम' आणि 'पापकर्मा' व 'दुष्टात्मा,' 'कीचक' द्रौपदीस भर सभेंत लाथ मारण्यापर्यंत उन्मत्त झाल्यामुळें, आपल्या पतींना पर्यायानें 'क्लीब' म्हणण्याइतक्या क्रुद्ध झालेल्या द्रौपदीस शांत करण्याकरितां, कालाची अपेक्षा करीत बसणाऱ्या धर्माला, कीचक-वधास आपली संमति आहे, असें पर्यायानें सुचाविणें भाग पडलें.

'कचिक-वधाची अशी हकीकत देतांना, 'कीचक,' 'विराट,' 'द्रौपदी,' व 'धर्म' यांच्या स्वभावाचें वर्णन श्रीव्यासांनीं 'विराटपर्वांत' वरीलप्रमाणें दिलें आहे. महाभारतांतीलच स्वभाववर्णन ह्या नाटकांत कायम ठेवलें असून त्या त्या स्वभावांच्या परिपाकाचें आविष्करण नाट्याचे दृष्टीनें चांगलें व्हावें म्हणून द्रौपदी व कीचक ह्यांच्या प्रथम भेटीसंबंधानें व शेवटचे कचिक-वधाचे प्रकारासंबंधानें व्यासकथेंत, महाभारतांतील इतर प्रसंगाचें अनुकरण करून, थोडाबहुत फेरबदल केला आहे.

हें नाटक पुस्तकरूपानें प्रसिद्ध होण्यापूर्वी 'महाराष्ट्र नाटक मंडळी'नें प्रयोगरूपानें लोकांच्या पुढें आणल्यामुळें, माझ्या कित्येक मित्रांना खासगी रीतीनें किंवा टीकाकारांच्या रूपानें मला उपयुक्त सूचना करण्यास संधि मिळाली. ह्या सूचनांपैकीं बऱ्याच सूचनांचा मी उपयोग करून घेतला आहे. शिवाय सांप्रतचे स्वरूपानें नाटक प्रसिद्ध करण्यापूर्वी रंगभूमीवर नाटकाचा प्रयोग मला स्वतःला पहावयास मिळाल्यामुळें बरींच दोषस्थळें मला टाळतां आलीं. ह्याकरितां 'महाराष्ट्र नाटक मंडळी'चा व सूचना किंवा टीका करण्याची मेहनत घेणाऱ्या मित्र-वर्गाचा मी फार आभारी आहे.

पुणें
तारीख १-९-०७ } ग्रंथकर्ता.

---

# कीचक-वध.

## अंक पहिला.

### प्रवेश १ ला.

*स्थळ*—राजवाड्याचा मुख्य दरवाजा. **सौदामिनी** व **सैरंध्री** प्रवेश करितात.

**सौदा०**—गडे सैरंध्री, आजच्या सारखी मजा तुला कधीं हस्तिनापुरास किंवा इंद्रप्रस्थास पहावयाला मिळाली होती का?—आमची मत्स्यपुरी ती मत्स्यपुरी!—आमच्या ह्या मत्स्यपुरीच्या चौथा हिस्सा—आठवा हिस्सा—तरी तुमचें हस्तिनापूर आहे काय?—हो, आलें आहे एवढें मोठें! मीं पुष्कळ गांव पाहिले आहेत, पण एकहि आमच्या नगरींतील लहानशा गल्ली एवढाहि नाहीं! आणि म्हणे हस्तिनापूर मत्स्यपुरी एवढें!

**सैरं०**—पण सौदामिनी, दुसऱ्याला बोलूं देशील, कीं तुझेंच चऱ्हाट एकसारखें चालावयाचें?

**सौदा०**—पण मी म्हणतें, असेल, तुझें इंद्रप्रस्थ मत्स्यपुरी एवढें मोटें असेल,—दुप्पट—चौपट—आठपट—सोळापट मोठें असेल.—आतां तर तुझी हरकत नाहीं? मग मी म्हणतें, आमच्या ह्या नगरींतल्यासारखे वीरश्रीनें नटलेले असले सुंदर पुरुष तुझ्या त्या हस्तिनापुरांत पहावयाला तरी मिळतात का?

**सैरं०**—सौदामिनी, जरा हळू बोललें तर नाहींका चालत? इश्श! कोणी ऐकलें म्हणजे? बायकांनीं पुरुषांच्या स्वरूपाची चर्चा करूं नये; पुरुषांच्या सद्गुणाबद्दल बोलावें.

सौदा०—आम्हा दासींना पुरुषांचे सद्‌गुण ग घेऊन काय करावयाचे आहेत?—म्हाताऱ्या आजीबाईच्या ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी मला नको सांगूस. त्या वल्लभ आचाऱ्याशीं नेहमीं एकांत करीत असतेस, तें काय तो साखरभात चांगला करतो म्हणून, कीं त्याच्या तालीमबाजीला पाकशाळेंतील खादीनें विशेष बाळसें आलें आहे म्हणून?—कां सैरंध्री आतां कां तोंड मिटलें?—रागावूं नकोस हो. अग पुरुष नाहीं का बायकांच्या रूपाची तारीफ करीत? दोघे चौघे चारगट गप्पा झोकायाला बसले म्हणजे हजर असलेल्यांच्या बायका तेवढ्या पतिव्रता, इतरांच्या आपल्या तशाच, असें समजून, त्यांच्या नटण्यामुरडण्यावर, बोलण्या-हांसण्यावर, टीका करीत नाहींत काय?

सैरं०—अग, चारगट पुरुषांचा कित्ता का आम्ही साळसूद बायकांनीं गिरवावयाचा?

सौदा०—मग काय दासींनीं बाईसाहेबांसारखें थोरपणानें उठावें, बसावें, बोलावें, होय?—मी तशी वागलें असतें; पण मला किनई खरोखरच बाईसाहेब झाल्याशिवाय, दासी असतानांच तुझ्यासारखा बाईसाहेबांचा टेंभा मिरवावयाला येत नाहीं. आणि आजच्यासारखा हा सुंदर पुरुषांच्या मेळ्याचा देखावा पाहिला म्हणजे माझी जीभ कशी चुरुचुरु बोलायलाच लागते!—मत्स्यनगरींतले सर्व सुंदर पुरुष बायकांना मोहीत करण्याच्याच हेतूनें मोठा थाट माट करून रस्त्यानें आपल्या रूपाचें प्रदर्शन करीत चालले असतां, मी म्हणें गप्प बसावें! हें होईल तरी कसें? आणि असें पहा, आजचा दिवस पुरुषांनींच तोऱ्यानें सर्व रस्ते गजबजून टाकण्याचा आहे; कारण, मत्स्यनगरींतल्या सर्व पुरुषांत अत्यंत सुंदर जे कीचक महाराज, ते आतां थाटानें राजवाड्यांत प्रवेश करणार आहेत. सैरंध्री, तूं अजून कीचक महाराजांना पाहिलें नाहींस नव्हे?

सैरं०—आमच्या बाईसाहेबांनीं मला नोकरीस ठेवण्याचे पूर्वीच ते एथून गेले होते.

सौदा०—नोकरीला लागून तुला दहाच महिने झाले नव्हे? आणि कीचक महाराज त्या पूर्वीच हस्तिनापुराला गेले. हस्तिनापुरांत तर आठ महिने कौरवे-

श्वरानें त्यांना आग्रहानें ठेवून घेतलें होतें; आणि बाईसाहेब म्हणत होत्या, हस्तिनापुरांत त्यांचा जयजयकार फारच झाला. कौरवेश्वर सुयोधन महाराज यांची पक्की दोस्ती संपादन करून, कीचक महाराज आज परत येत असल्यामुळें ह्यावेळीं मत्स्यपुरी उल्हासानें व शृंगारानें हांसत व नाचत असल्यासारखी दिसत आहे!— सैरंध्री, मी मघापासून पाहतें आहे, तुझाच तेवढा चेहरा कांग असा उतरलेला?

**सैरं०**—दुसऱ्याला आरती ओवाळायची आणि दृष्ट काढायची, हीं कामें मला आवडत नाहींत. म्हणून मीं राणीसाहेबांना विनंति केली कीं, आजच्या समारंभांत महादरवाज्याजवळचें कामच मला नको.—राणीसाहेबांनीं माझी विनंति मान्यहि केली होती, मग पुन्हां कां बाई हुकूम फिरला कोण जाणे!

**सौदा०**—वागवा! मीं तर मुद्दाम म्हणून राणीसाहेबांच्यापाशीं रदबदली केली, कीं सैरंध्रीला मजबरोबर ओंवाळण्याच्या कामावर नेमा म्हणून.—अग तुला माहित नाहीं, तुझा तो बल्लभ आचारी किंवा कंकभट यांच्यापेक्षां शंभर पटीनें कां सहस्रपटीनें कीचक महाराज सुंदर आहेत हो!—दुनियेंत असा मदनाचा पुतळा सांपडावयाचा नाहीं, अशी माझी खात्री आहे. अग ओंवाळायला जर आम्ही पुढें झालों नाहीं—दृष्ट काढावयाला जर आह्मी पुढें सरसावलों नाहीं तर त्या सौंदर्याच्या गड्याच्या अगदीं जवळ आह्मांला केव्हांग जावयाला मिळणार?—मीं तुझ्यावर हे उपकारच केले आहेत. त्या मंदहासिनी, शशिमुखी, कमला, चपला, सगळ्याजणी माझ्या नांवानें खडे फोडीत आहेत.

**सैरं०**—तें कांग बाई?

**सौदा०**—त्यांना मागें टाकून, मी तुला पुढें केलें म्हणून.

**सैरं०**—खरेंच गडे, मजवर एवढे उपकार केले नसतेस तर फार चांगलें झालें असतें.

**सौदा०**—कीचक महाराजांना पाहिलें नाहींस तोंपर्यंत तुझ्या ह्या वल्गना! एकदा का त्या मनोहर मूर्तीचें दर्शन झालें, म्हणजे जन्मभर माझ्या ह्या आजच्या उपकाराची आठवण करशील. अग वेडे, जवळ उभें राहून डोळे भरून कीचक महाराजांना पाहिलें, म्हणजे जन्माचें सार्थक झाल्यासारखें वाटतें हो!

[ मंदहासिनी येते ]

**मंद०**—गडे सौदामिनी, राणीसाहेब येऊन पोंहोंचल्याच म्हणून समज. बरोबर रत्नप्रभा बाईसाहेबहि आहेत. आरतीची–ओवाळणीची–नीट तयारी आहेना ?

**सौदा०**—मोठी आली आहे माझ्या कामावर देखरेख करायला ! तुलाग कोणी इथें यायला सांगितलें ?–राणीसाहेब आयत्यावेळीं आल्या म्हणजे तूं त्यांच्याबरोबर ये.–पुढें पुढें करायला पाहिजे!–जमलेल्या पुरुषांना चेहेरा मोहरा, एव्हांपासूनच कांहीं नको दाखवावयाला !–जा, त्या तेथें जाऊन बैस जा, राणीसाहेब आल्या ह्मणजे कीचक महाराज येईतों त्या तिथें पडद्यांत बसणार आहेत; तिकडे जाऊन आपली खिडकी तेथें बसूं द्या.

**मंद०**—पुढें जाऊन तयारी पहा, म्हणून राणीसाहेबांनीं सांगितलें म्हणून आलें हो ! नाहीं तर तुझ्याशीं बोलायला माझें आडलें आहे खेटर.

**सौदा०**—पहा, तयारी पहाहो, नीट पहा,–हे कलश बघ–हे कुंकवाचे पट्टे पहा–ते आंब्याचे डाहाळे उचलून पाणी तुडुंब भरलें आहे कीं नाहीं नीट तपास कर–महादरवाजावर लाविलेलीं हीं तोरणें ध्यानांत ठेव–आणि पताकाहि विसरूं नकोस. शिवाय कीचक महाराजांना ओवाळण्याकरितां हें–आरतीचें-आणि ओंवाळणीचें–सामान घेऊन आम्ही–दोघीजणी–जिवंत जागच्याजागीं उभ्या आहोत–नीट डोळे फाडून बघ.–कां ? झाले समाधान ?–आहेना सर्व तयारी? –जा आतां, जाहं ! [ मंदहासिनी जाऊं लागते. ]

**सैरं०**—अग मंदहासिनी, तुला हें आरतीचें काम आवडत असेल तर तूं राहिनास उभी येथें ? मी आपली राणीसाहेबांच्या जवळ राहतें. [ मंदहासिनी परत येऊं लागते. ]

**सौदा०**—वाग वा ! जा तूं आपल्या कामाला. तुझ्या तोंडाला पुष्कळ पाणी सुटेल, पण मी ऐकायला पाहिजेना ? [ मंदहासिनी जाते ] खरेंच गडे सैरंध्री, ही मंदहासिनी इतकी कुरूप असतांना, पुरुषांच्या पुढें पुढें करावेसें हिला वाटतें तरी कसें ?–लंगडें तें लंगडें आणि गांवदरीला चरेना !

**सैरं०**—पण माझ्या जागीं ती असती तर तुझें काय बिघडत होतें ?

**सौदा०**—मी नाहीं तिला कधीं माझ्याबरोबर घ्यायची. दोन तीनदां माझ्याबरोबर देवदर्शनाला आली होती, आणि बाई तिच्या चेहऱ्याचें तें कळ-

कटलेलें खापर पाहून इतक्या मेल्या पुरुषांपैकीं एकानें तरी पुन्हां वळून आमच्याकडे पाहावयाचें होतें! एखाद्या चारगटानें देखील पाहिलें असेल तर शपथ; आणि तीच तूं बरोबर असलीस, किंवा मी एकटीच असलें ह्मणजे निर्लज्ज पुरुष राहूं देच, पण तो बघ तो मोठा विद्वान—तो दुसरा मोठा प्रतिष्ठित—तो तिसरा धार्मिक म्हणून मिरवणारा—कसे मेले वळून वळून पहात आहेत!—गिधाडांची नजर जशी मांसाच्या तुकड्यावर असते, तसे मेले—अग बाई! राणीसाहेबांची स्वारी आली! नीरांजनें पेटवून ठेवूं या!

[ सुदेष्णा, रत्नप्रभा, व मंदहासिनी प्रवेश करितात. ]

सुदे०—कायग सौदामिनी, अग सैरंध्री,—नीरांजनें पेटवून ओंवाळायची तयारी आहेना?

सौदा०—होय बाईसाहेब, सर्व तयारी करुन आम्ही कीचक महाराजांची वाट पहात बसलों आहोंत.

सुदे०—दादा इतक्यांत येऊन पोंहोंचेल; हं ऐक, शिंगें वाजलीं, स्वारी अगदीं जवळ आली आहे.

मंद०—होय बाईसाहेब, ते पहा विराट महाराज व कीचक महाराज, अंबारींतून उतरून गुरु-पुरोहितांचा आशीर्वाद घेत आहेत! वाड्यांत प्रवेश करण्याकरितां आतां इतक्यांत येथें येतील.

सौदा०—( सैरंध्रीस एकीकडे ) कशी कंजारीण आयत्या वेळीं पुढें झाली? सर्वांच्या अगोदर हिनेंच कीचक महाराजांना पाहिलें! तुला दिसले का?

सुदे०—कायग मंदहासिनी; रत्नप्रभाराणीसाहेब कोठें आहेत?

मंद०—ह्या येथेंच आहेत, बाईसाहेब.

सुदे०—अग वहिनी, अशी तूं आतां मागें मागें कां उभी? दादाला पहावयाला इतका वेळ तूं उत्सुक होतीस,—आणि दादाला 'महाराज' ही पदवी मिळून, तो जवळ आला असतां, तुझें आपलें पाऊल मागेंच! खरेंच वहिनी, माझे दादा कीचक महाराज, त्यांच्या अंगावर फुलें उधळून त्यांचा जयजयकार करायला त्यांच्याच बायकोला लाज वाटावी, हें आश्चर्य आहे बाई!

रत्न०—खरेंच वन्सं, अशा आनंदाच्या वेळीं माझ्या जिवाला हुरहुर कां वाटावी बरें? मी जयजयकार करून, त्यांच्यावर फुलें उधळीन खरी, पण तिकडून मजकडे पाहणेंच झालें नाहीं तर?

सुदे०—इश्श्–भलती शंका कशालाग वहिनी मनांत आणतेस? (जवळ घेऊन) दादा आठ नऊ महिने हस्तिनापुरांत होता, तरी आपल्या पट्टराणीवरचें त्याचें प्रेम कधीं वेडे कमी होईल काय?

रत्न०—हस्तिनापुरच्या बायका फारच सुंदर असतात म्हणून मीं ऐकलें आहे.

सुदे०—आमच्या दादासारखा सुंदर पुरुषही जगांत मिळायचा नाहीं; आणि वहिनी, तुझ्यासारखी सुंदर स्त्रीहि मिळायची नाहीं.

रत्न०—वन्सं, तुम्ही उगीच माझी कांहीं तरी थट्टा करितां झालें!

सौदा०—खरेंच बाईसाहेब, उत्तरेकडच्या बायका फारच सुंदर असतात, म्हणून म्हणतात. माझी आई देखील उत्तरेकडची होती म्हणे.

मंद०—म्हणूनच तूं अशी सुंदर दिवटी जन्मास आलीस वाटतें!

सौदा०—गप्प बैस चावटे! आणि खरंच सांगूंका बाईसाहेब? उत्तरेकडचे पुरुष मात्र कळाहीन आणि कंगाल दिसतात. दक्खन कंगाल म्हणून कितीहि नाकें मुरडोत; पण इकडचे पुरुष कसे सतेज असतात. कीचक महाराजांना सर्वांनीं हौसेनें ठेवून घेतलें, ते उगीच नव्हे; शिवाय हातच्या कांकणाला आरसा कशाला? पांडवांच्या द्रौपदीराणीसाहेबांच्या जवळ असणारी ही सैरंध्री कशी नक्षत्रासारखी आहे पहा! नाहीं तर तो बल्लभ आचारी, किंवा कंकभट, मेल्यांच्या निस्तेज चेहऱ्याकडे पाहवतच नाहीं.

सैरं०—गडे सौदामिनी, वीज एखादे वेळेस चमकली तर लोक तिचें कौतुक करतात, पण एकसारखी जर कडाडत राहिली तर भीति वाटून लोकांना नकोशी होते हो!

रत्न०—खरेंच वन्स, ही आपली नवीन दासी रूपानें फारच चांगली असून, तिचें भाषण मधुर व मार्मिक आहे.–हस्तिनापुराच्या सगळ्याच बायका जर अशा असतील तर मत्स्यदेशाच्या बायकांनीं आपल्या नवऱ्यांना तिकडे फिरकूं देखील देतां कामा नये.

[ पडद्यांत शिंगें वाजतात. ‘ कींचक महाराजकी जय ’ असे शब्द होतात. छत्रानें युक्त विराट, छत्रानें युक्त व दोन तरुणी चामरें उडवीत आहेत असा कीचक, कंकभट, मैत्रेय, वगैरे प्रवेश करतात. कीचकावर आकाशांतून पुष्पवृष्टि होते. सर्वजण फुलें व गुलाल उधळून, ‘ कीचक महाराजकी जय ’ असा शब्द करतात. ]

**विराट०**—कीचक महाराज, आपल्या आगमनानें माझी मत्स्यपुरी आनंदित झाली असून, ही आपली प्रिय भगिनी आपल्या दर्शनाकरितां उत्सुक होऊन येथें उभी आहे. ती पहा, तिच्या शेजारी आपली राणी म्हणजे माझी बहीण रत्नप्रभा उभी आहे. त्यांच्याशीं कुशलतेचे दोन शब्द बोलून आपण राजवाड्यांत प्रवेश करावा.

**कीचि०**—अक्का, तुम्ही सगळ्याजणी माझ्या स्वागताकरितां उत्सुक असलेल्या पाहून, मला फार आनंद होतो. हस्तिनापुरांत माझें स्वागत फारच मोठ्या थाटानें झालें व सार्वभौम कौरवेश्वर सुयोधन ह्यांनीं माझा फारच मान ठेविला हें खरें; पण अक्का, आजच्यासारखा आनंद मला त्यावेळींहि झाला नाहीं. कारण प्रेमाच्या मनुष्यांची गोष्ट कांहीं निराळी असते.—आपणा सर्वांचें कुशल आहेना ?

**सुदे०**—दादा, हस्तिनापुरच्या स्वारीहून आपण मानमान्यता मिळवून परत आलां, हें ऐकून मत्स्यपुरीला आनंद व्हावा हें साहजिकच आहे. दादा, कौरवेश्वरानें आपला जयजयकार कसकसा केला, हें समजण्याला आम्ही सर्वजणी उत्सुक आहों, आणि माझी वहिनी रत्नप्रभा हिला तर सर्व हकीकत आपल्या तोंडून केव्हां ऐकेनसें झालें आहे. म्हणून म्हणत्यें चल', आतां राजवाड्यांत प्रवेश करण्याला विलंब नको !

**कीच०**—अक्का, थोड्या वेळानें दरबारांत विराटमहाराजापाशीं कौरवेश्वराचा निरोप कळवून, मी सर्व हकीकत सांगणारच आहे; पण आतांचा माझा हा पोषाख पाहूनहि, सार्वभौम कौरवेश्वर मला किती मानतो, हें सर्वांच्या लक्षांत येईल. तुम्हां सर्वांना माहितच आहे कीं, ‘ ह्या मत्स्यदेशाचा महाराज ’

अशी पदवी भारतेश्वर सुयोधन यानें मला दिली आहे. आपले विराटराज ह्यांना महाराजाधिराज अशी नवी पदवी सार्वभौमानें दिली असून अधिराजांच्या हाताखालीं महाराज ह्या नात्यानें पूर्वीचेंच काम मी करावें असें सार्वभौमानें ठरविलें आहे. पण अक्का, मत्स्येश्वर महाराजाधिराज विराट महाराज, मी आपणाला असें सांगतों कीं, महाराज या पदवीनें माझा खरा मान झाला असें मी समजत नसून, ह्या माझ्या पोषाखानें माझा खरा मान झाला असें मी समजतों. मला महाराज ही पदवी देतांना सार्वभौम सुयोधनानें हें मला दिलेलें छत्र पहा. हें छत्र मूळचें कोणाचें असून ह्यावर कोणाच्या यशाचें वर्णन लिहिलेलें असावें असें तुम्हांला वाटतें? मैत्रेया, ह्यावरील अक्षरें वाचून सांग पाहूं कोणाचें हें छत्र आहे तें?

**मैत्रे०**—छत्रावर आणखी कोणचीं अक्षरें असणार! अमक्या तमक्या शिंप्यानें ही छत्री शिवली म्हणून दोन चार टाक्यांत त्याचें नांव गोवलेलें असणार! चितान्यानें त्या वरचीं चित्रें काढिलीं म्हणून चित्रांतल्या एखाद्या बाईच्या लाथा खात तिच्या पायाच्या तळव्यांत तो लपून बसणार!

**कीच०**—बेट्या मैत्रेया, राजकारण तुला कांहींच समजत नाहीं!

**मैत्रे०**—तो कंटाळवाणा विषय मीं कंकभटाकडे दिला आहे. पूर्वी सगळें राजकारण मजकडेच होतें,—

**कीच०**—मग अलीकडे काय झालें?

**मैत्रे०**—युधिष्ठिर महाराजांच्या दरबारांतला हा कंकभट येथें आल्यापासून द्यूत आणि राजकारण मीं ह्याच्याकडेच सोंपविलें आहे. युधिष्ठिराप्रमाणेंच हा राजकारणांत हुषार आणि द्यूतांत प्रवीण आहे.

**कीच०**—मग आपली धनदौलत व बायको द्यूतांत हा युधिष्ठिराप्रमाणें तेव्हांच हारून जाईल, आणि आपल्या भावांच्या गळ्याला मिठी मारून दुःखाच्या खड्यांत पडेल!

**मैत्रे०**—त्याला भाऊ बिऊ कोणी नाहीं. हुद्याच्या नात्यानें मीच काय तो येथें त्याला भाऊ. मी संभाळून आहें, दूरदूरच असतों. धन दौलत ह्मणावी

तर प्रथम एक फुटका लोटा होता.—आतां द्यूतांत जिंकून जिंकून दोन पैसे कडोसीस लावून आहे. हुषार आहे हो बेटा!—बायको म्हणावी तर लग्नाची कोण दिसतच नाहीं, आणि द्यूतांत मिळविलेले पैसे मात्र नाहींसे होतात खास!

कीच०—तुम्ही युधिष्ठिरापाशीं होतां, तेव्हां हें छत्र कोणाचें असावें! ओळखतां काय?

कंक०—इंद्रप्रस्थास पाहिल्यासारखें वाटतें.

कीच०—नीट पाहून ओळखा बरें!

कंक०—युधिष्ठिर महाराजांचे असावें.

कीच०—कां? असा रडका आवाज कां? मला हें छत्र मिळालेलें पाहून मत्स्यपुरींतील प्रत्येक मनुष्याला आनंदच वाटला पाहिजे.

मैत्रे०—युधिष्ठिर महाराजांच्या मागें द्यूत जसें ह्याच्या वाटणीला आलें, तसें त्यांचें छत्र आलें नाहीं म्हणून वाईट वाटतें आहे कंकभटाला!

कीच०—मत्स्येश्वर अधिराज विराट महाराज, हा पोषाख देण्यापूर्वी गदा-युद्धांत व धनुर्विद्येंत माझें अलौकिक प्राविण्य पाहून, सार्वभौम भारतेश्वर फारच खूष झाले. मी जर लहानपणापासून हस्तिनापुरांत असतों तर द्यूताची एवढी खटपट शकुनीमामांना करण्याचें कारणच पडलें नसतें!—माझ्या गदेच्या प्रहारानें भीमाची मांडी कधींच चूर्ण झाली असती!—द्रौपदीस्वयंवराचे वेळीं मी जर हजर असतों, तर माझ्याच बाणानें मत्स्यभेद होऊन, द्रौपदी माझीच पट्टराणी झाली असती!—त्या त्या प्रसंगीं मी नव्हतों, म्हणून सुयोधन महाराज अत्यंत हळहळले; आणि झाली ती गोष्ट झाली असें म्हणून त्यांनीं दुःखाश्रू टाकले!

विरा०—कीचक महाराज, आपला पराक्रम खरोखरच तसा आहे.

सुदे०—खरेंच दादा, तूं जर हस्तिनापुरांत असतास तर द्रौपदीला पांच नवरे करण्याचें कारणच पडलें नसतें.

रत्न०—पांचहि पांडवांचे गुण येथें एकवटल्यासारखे आहेत. द्रौपदी-स्वयंवराला स्वारी हजर नव्हती हें माझें सुदैवच म्हणावयाचें!

कीच०—आणि हजर असतों तरी तुझीच दासी म्हणून तुझ्या महालांत द्रौपदीला ठेविली असती.—आणि अजून प्रतिज्ञा करून मी असें सांगतों कीं,

थोड्या दिवसांनीं कौरव—पांडवांच्या युद्धाची वेळ आली म्हणजे, भीष्म, द्रोण, किंवा कर्ण, ह्यांच्या हातूनहि न होणारा पराक्रम मी करून दाखवीन.—माझ्या गदेनें भीमाचे शतशः तुकडे झाल्यावर, माझ्या बाणांनीं अर्जुन गतप्राण झाल्यावर, युधिष्ठिराच्या शेंडीला पकडून, मी माझ्या पायांवर त्याला डोकें ठेवावयास लावून, त्याला जीवदान देईन, व त्याला गरीब भिक्षुकाचा पोषाख घालून, अरण्यांत तपश्चर्या करण्यास पाठवून देईन. नकुल सहदेव ह्या नटव्या जोडीनें बायकांचा पोषाख करून, अशा तऱ्हेनें माझ्यावर चामरें उडविण्याचें कबूल केलें तरच त्यांना जिवंत ठेवीन. असा अद्भुत पराक्रम करून दाखविण्याचें मीं भारतेश्वराला वचन दिलें आहे. अशीं दिव्य कृत्यें करून दाखविल्यावर इंद्रप्रस्थाचें राज्य, व युद्धांत जिंकलेली दासी पांडवांची वधू द्रौपदी,—हीं मला अर्पण करण्याची सुयोधनानें प्रतिज्ञा केली आहे. म्हणून म्हणतों अक्का, तूं तुझ्या वहिनीला सांग कीं, द्रौपदीला तुझी दासी होण्याचा प्रसंग लवकरच आल्यावांचून राहणार नाहीं.

मैत्रे०—पण तसें नकोच व्हावयाला. कारण रत्नप्रभा राणीसाहेबांहून द्रौपदी फार सुंदर आहे म्हणें.

रत्न०—राणीची दासी आणि दासीची राणी होण्याचा तो प्रसंगच नको यायला.

कीच०—पट्टराणी ती पट्टराणीच राहील.—बाकी तो प्रसंग यावा म्हणून तर माझा एवढा उद्योग! माझ्या प्रतिज्ञेची मला आठवण राहावी, म्हणून कौरवेश्वरानें माझ्या पायांतील चढावावर 'भीम' अशीं अक्षरें लिहून ठेविलीं आहेत. गदायुद्धांत मृतप्राय होऊन भीम जमीनीवर पडल्यावर डाव्या पायाचा आंगठा त्याच्या नरडीला लावून त्याचा प्राण मी घेईन. माझ्या बाणांनीं रथांतून खालीं फेंकून दिलेल्या अर्जुनाच्या मस्तकावर माझ्या उजव्या पायाची लाथ बसावयाची असल्यामुळें, उजव्या पायांतल्या चढावाच्या टांचेखालीं अर्जुन सांपडला आहे. आणि अक्का, तुझ्या वहिनीला सांग, मनांत उगीच मत्सरबुद्धि आणूं नकोस,—द्रौपदी स्वयंवर झाल्यावर पांच पांडवांशीं जेव्हां द्रौपदीचें लग्न

लागलें, त्या समारंभांत जामात रुसले असतां द्रुपद राजानें " द्रौपदीपति " हीं पंचाक्षरें हिऱ्यांवर कोरून पांच पांडवांना पांच आंगठ्या नजर केल्या. द्यूताचे वेळीं त्या आंगठ्या सार्वभौम सुयोधनाच्या मालकीच्या झाल्या. भावी युद्धानंतर जिंकलेल्या द्रौपदीचा मी एकटाच पति होणार, म्हणून कौरवेश्वरानें " द्रौपदी-पति " ह्या अक्षरांच्या पांचहि आंगठ्या ह्या वीराच्या ह्या भाग्यशाली व परा-क्रमी हाताच्या पांचहि बोटांत घातल्या आहेत ! ह्या आंगठ्या माझ्या हातांत घातल्यावर भर दरबारांत शंभर कौरवांनीं " द्रौपदीपति " " द्रौपदीपति "असा माझ्या नांवाचा जयजयकार केला !-(चौरी धारण करणाऱ्या दासी-" द्रौपदी-पति कीचकमहाराजकी जय"-असा जयजयकार करितात) विराट महाराज, अक्का, ह्या चौरी धारण करणाऱ्या दासी सार्वभौम भारतेश्वराने मला नजर केल्या असून, पांडवांना जिंकण्याच्या माझ्या प्रतिज्ञेची मला वारंवार आठवण करण्या करितां " द्रौपदीपति " ह्या शब्दांनीं त्यांनीं माझा हरदम जयजयकार करावा अशी त्यांना माझी आज्ञा आहे. ( दासी वरील तऱ्हेनें जयजयकार करितात सैरंध्रीशिवाय इतर दासी फुलें उधळतात.)

सुदे०—सैरंध्री, सौदामिनी, आतां नीरांजनें ओंवाळून दादाची द्रिष्ट काढा.-येथेंच कितीवेळ उभें राहावयाचें ! ( ओंवाळून सौदामिनी द्रिष्ट काढते. सैरंध्री ओंवाळणीचीं नीरांजनें घेऊन हात कांपत तशीच उभी राहाते.)

कीच०—अक्का, हस्तिनापूरच्या दासींनाहि आपल्या सौंदर्यानें लाजविणाऱ्या असल्या दासी तुजजवळ आहेत म्हणावयाच्या !-भारतेश्वर सुयोधनाचे राज-मंदिरांत मीं प्रथम ज्या वेळीं प्रवेश केला, त्या वेळीं एक हजार सुंदर तरुण दासी ओंवाळणी घेऊन दुतर्फा उभ्या होत्या. कौरवेश्वरानें मला विनंति केली, यांतून ज्या दासी माझ्या पसंतीस उतरतील, त्यांना मत्स्यदेशांत मी घेऊन जावें. भारतेश्वराच्या त्या विनंतीला मान देऊन, गांधारदेशाहून नुकतीं आलेलीं हीं दोन रत्नें नाटकशाळेंत ठेवण्याकरितां मी बरोबर आणिलीं आहेत. पांडवांचा तपास करण्याकरितां थोडेच दिवसांनीं सुयोधन महाराज मत्स्यदेशांत येणार आहेत; ह्या दोन दासींच्या मोबदला म्हणून त्यांना नजर करण्यालायक एकहि दासी आपल्याजवळ नाहीं, म्हणून इतकावेळ मला काळजी वाटत होती; पण

अक्का, आपल्या तेजानें ह्या दीपज्योतींनी लाजविणारी ही तुझी सैरंध्री पाहून माझी काळजी दूर झाली आहे. ह्या सैरंध्रीला मला देण्याला जर अक्का, तुझी हरकत नसेल, आणि विराटमहाराज, ही दासी मला दिल्यानें आपल्या नाटकशाळेंतील करमणुकीला अडथळा येईल असें आपणांला वाटत नसेल,—

विरा०—ही बिलकूल माझ्या दिमतीलाच नमते.

कीच०—मग अक्का, तुझ्या सेवेला इतर दासी चालतील. सुयोधन महाराज मत्स्यदेशांत येईतों हिला मी माझ्या नाटकशाळेत ठेवणार.—माझ्या सहवासांत राहून पराक्रमी पुरुषांचें रंजन कसें करावें हे शिकल्यावर तिला मी भारतेश्वराला अर्पण करीन.

मैत्रे०—भारतेश्वराच्या सुखाची काळजी जर कोणास असेल तर ती कीचक महाराजांनाच आहे.

रत्न०—(स्वगत) पुरुप परदेशांत फार दिवस राहिले, म्हणजे चंचल मनाचे होऊन येतात म्हणून म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं.

सौदा०—सैरंध्री, मी केव्हांची द्रिष्ट काढली, तूं अजून महाराजांना ओवाळायची काय म्हणून थांबली आहेस? महाराजांनीं आपल्या खास नाटकशाळेत ठेवण्याचा मान दिला, म्हणून इतकें कांहीं गोंधळून जायला नको! (एकीकडे सैरंध्रीस) आजचे माझे उपकार मग विसरूं नकोस हो! (उघड) महाराजांनीं माझ्या मैत्रिणीचा जो आतां अवचित सन्मान केला, त्यामुळें तिला कांहीं सुचेनासें झालें आहे. गरिबांना एकदम राजलक्ष्मी मिळाली, म्हणजे थोडा वेळ अशीच स्थिति होते. माझ्या मैत्रिणीच्या ऐवजीं मी ओंवाळतें, त्याची माफी असावी.

कीच०—असल्या सेवाचाकरीच्या कामावर इतक्या सुंदर अप्सरेला अक्का तूं नेमिलीस कशी, ह्याचेंच मला आश्चर्य वाटतें! सुंदर फुलांना तळहातावर झेलून धरून प्रेमानें हुंगावें, किंवा मस्तकावर अलग उचलून धारण करावें; पायांखालीं का कोणी त्यांना तुडवितो! (सौदामिनी ओंवाळते. कीचक महाराजकी जय असा शब्द होतो. चौरीवाल्या 'द्रौपदीपति कीचक महाराजकी जय' असा जयजयकार करितात. फुलें उधळण्यांत येतात.)

विरा०—कीचकमहाराज, आतां राजमंदिरांत प्रवेश करावयाचा. ( फुलें व गुलाल उधळीत व कीचकमहाराजकी जय असा जयजयकार करीत मैत्रेय व कंकभट शिवाय सर्व जातात. )

मैत्रे०—कां कंकभट, आपली काय म्हणून मुद्रा कावरी बावरी ? चेहरा इतका उतरलेला काय म्हणून ? ही सैरंध्रीची शिकार आपल्या हातून जाऊन, कीचक महाराजांच्या नाटकशाळेंत शिरली म्हणून वाटतें हे अश्रू! अरे, ह्या दासी लवंडीच्या अशाच बेइमान असावयाच्या ! जुगाराचे पैसे यांना कितीहि दिले तरी, त्या थोड्याच संतुष्ट राहाणाऱ्या आहेत !

कंक०—उगीच कां बरें ही रिकामी थट्टा ?

मैत्रे०—मग कंकभट, अरे तूं गरीब ब्राम्हण आणि सैरंध्रीला कीचक महाराजांच्या नाटकशाळेचा मान मिळाला, म्हणून तुला कां वाईट वाटतें ?

कंक०—अरे युधिष्ठिर महाराजांचें छत्र पाहिल्यावर पांडवांच्या दरबारांत तुझ्यासारख्या मैत्रेयाना जुगारांत मिळत असलेल्या द्रव्याची आठवण झाली इतकेंच !

मैत्रे०—इतकेंच असल्यावर हरकत नाहीं. मग तूं असें समाधान करून घे, विराटमहाराजांच्या दरबारांत दोन पैसे जुगारांत कमी मिळाले, तर आतां सैरंध्री कीचक महाराजांकडे लागली, तेव्हां तुझा खर्चहि कमी झाला. हिशेबांत अखेर शिलकेवर नजर ठेवावी. उगीच जमा करा आणि खर्च करा, ही उठाठेव काय कामाची ?

कंक०—हें भलतेंच काय बोलतोस ! आह्मी एका गांवचे म्हणून ती केव्हां केव्हां माझ्याशीं बोलते इतकेंच. दासीबिशीवर वाईट नजर ठेवण्याचें महत्पाप माझ्या हातून कधींहि होणार नाहीं.

मैत्रे०—जाळें टाकून मासा तूं जमिनीवर आणला होतास, पण कीचकानें त्याला उचलून नेलें. महत्पाप लागणार नाहीं, इतकीच आतां तुला फुशारकी उरली आहे.—अरे, स्वारी बरीच पुढें गेली चल लवकर जाऊन मिळूं.

कंक०—तूं हो पुढें, मी जरा बल्लभ आचाऱ्याला सरकारची आज्ञा कळवून स्वारी दरबारांत पोहोंचते न पोहोंचते तों हजर होतों.

मैत्रे०—सौदामिनी म्हणत होती कीं, सैरंध्री केव्हां केव्हां बल्लभ आचाऱ्याचे कानांशीं लागते, केव्हां केव्हां तुझ्याशीं कुजबुजते, आणि म्हणून तुमची एकमेकांत चुरस आहे!–आतां तिला तिसराच यजमान भेटला तेव्हां तुम्ही दोघे चुरस विसरून एक होणार म्हणावयाचे !

कंक०—हें पहा मैत्रेया, कीचक महाराजासंबंधानें मला एक गोष्ट तुला विचारावयाची आहे.

मैत्रे०—पूर्वी सैरंध्रीशीं एकांतांत कुजबुजतांना मला कोठें तुम्ही आपल्या कटांत घेतलेंत ?–मीं ह्मातारा असलों म्हणून काय झालें ?–आतां तुम्हींच दोघे करा खलबतें.–निस्तरावयाच्या वेळेस तेवढा मी कटांत यायला पाहिजे. असा मी फसावयाचा नाहीं. [ जातो. ]

कंक०—( स्वगत ) धिःक्कार असो या धर्मराजाच्या जन्माला ! बारा तेरा वर्षांपूर्वी सर्व आप्त इष्ट नको नको म्हणत असतां, द्यूत खेळून या जुगारूनें, दुष्टांनीं भर सभेंत आपल्या बायकोची विटंबना केलेली पाहिली,–आज स्वतःच्या छत्रचामरांचा व आपल्या भावांच्या नांवलौकिकाचा अपमान एका मदोन्मत्त व हेकेखोर अरेराव्यानें केलेला पाहण्याचें ह्याच्या नशिबीं आलें आहे.–शक्तीची रग जिरविणारा कोणीहि न भेटल्यामुळें बेफाम झालेल्या ह्या मत्स्यदेशाच्या सेनापतीनें 'द्रौपदीपति' 'द्रौपदीपति' म्हणून माझ्या डोळ्यांदेखत व द्रौपदीच्या समोर उभा राहून मिरवावें, ह्याहून पांडवांची आणखी वाईट स्थिति कोणची होणार !–सुयोधना, राजसूय यज्ञाचे वेळीं स्त्रीस्वभावानें द्रौपदी तुला चुकून हांसली, त्याचें प्रायश्चित्त द्रौपदीला भर सभेंत नग्न करण्याचा प्रयत्न करून, व आम्हां पांडवांना वनवासाला पाठवून, आह्मांला दिलेंस तितकें पुरें झालें नाहीं काय ?–परमेश्वरा, दुःशासनानें द्रौपदीच्या निरीला ज्यावेळीं हात घातला, त्यावेळीं चमत्कार दाखवून आंधळ्या धृतराष्ट्राच्या मनांत सद्बुद्धि उत्पन्न करून पांडवांची अब्रू वांचविलीस, त्याचप्रमाणें आतांहि राजा विराट व राणी सुदेष्णा ह्यांना सुबुद्धि देऊन पांडवांना सांप्रतच्या प्रसंगांतून पार पाडून ने. ( जातो. )

---

## प्रवेश २ रा.

स्थळ—राजवाड्यांतील एक रस्ता. **मैत्रेय** प्रवेश करितो.

**मैत्रे०**—हा कंकभट गेला तरी कोठें ? कालपासून बेट्याचें मन कांहीं ठिकाणावर नाहीं. सैरंध्रीच्या नादीं लागून तिच्या पाळतीवर तो असला पाहिजे. ही सौदामिनी इकडेच येत आहे, हिला विचारलें म्हणजे कंकभटाचा तपास लागेल. ( सौदामिनी येते. ) सौदामिनी, ए–सौदामिनी,–अरे ही आपल्याच तोऱ्यांत ! आजकालच्या ह्या तरुण पोरी ह्माताऱ्यांकडे पाहिनातशा झाल्या अं !–आमच्या तरुणपणीं असें नव्हतें. मी भर ज्वानींत असतांना, कसलीहि थेरडी भेटो, एकदां तरी पाहावयाचेंच. आतां मनूच पालटला !–ए बिजलीबाई–ए बिजलीबाई–

**सौदा०**—नमस्कार करतें मैत्रेय भटजी, आपला काय हुकूम आहे ?

**मैत्रे०**—तुला काय आठ मुलांचा आशिर्वाद देऊं ? का आठ मुलींचा आशिर्वाद देऊं ? किती पाहिजेत बोल.

**सौदा०**—मला एकदेखील मूल नको. मूल झालेल्या बायकांचा पुरुष कंटाळा करतात हो !

**मैत्रे०**—पण ह्मातारे कंटाळा करीत नाहींत.

**सौदा०**—म्हातारे कां म्हटलें ?

**मैत्रे०**—राहिलें ! तर मग आठ मुलांच्या ऐवजीं, आठ नवरे मिळोत, असा आशिर्वाद देऊं का ?

**सौदा०**—हें काय हो भटजी ? आम्ही दासी झालों, म्हणून भलती सलती थट्टा मेली !–आणि आपल्या म्हातारपणची तरी चाड ठेवायची होती !

**मैत्रे०**—आशिर्वाद द्यायला म्हातारा काय, तरुण काय, दोघेहि सारखेच. शिवाय आशिर्वाद देणाऱ्या पुरुषांचे केंस जितके अधिक पांढरे, तितका तो अधिक निरुपद्रवी असें समजून, बायका पांढऱ्या केंसांकडे आदरानें पाहातात. —माझ्याशीं उद्धटपणानें वागणारी तुझ्याशिवाय दुसरी दासी कोणीच नाहीं.—बाकी सगळ्याजणी माझ्याशीं बोलतात, चालतात,—

सौदा०—पांढरे केंस बायकांना आवडतात, म्हणून बायका तुमच्याकडे पाहतात, असें का तुम्हाला वाटतें?

मैत्रे०—अलबत, मला तर असेंच वाटतें!

सौदा०—पांढऱ्या केंसांकडे पाहण्याचें बायका टाळीत नाहींत, ह्याचें कारण एवढेंच कीं, म्हातारे पुरुष स्त्रियांच्या सौंदर्याच्या कसोटीचे दगड आहेत. म्हातारे देखील चोरून चोरून पाहूं लागले म्हणजे समजावें, कीं आपल्या नजरेच्या विजेच्या तडाक्यानें तरुण घायाळ झालेच पाहिजेत.—बरें म्हातारे बावा! मी आपल्याला आदरानें—विनयानें—विचारतें हो, मला हांक मारण्याची काय म्हणून मेहेरबानी झाली?

मैत्रे०—सैरंध्री कोठें आहे?—खरें मी विसरलोंच, सैरंध्री आतां कीचक महाराजांचे नाटकशाळेंत रहावयास गेली असेल नव्हे?

सौदा०—नाहीं, अजून नाहीं गेली.

मैत्रे०—हॅं! हें कसें बोवा?—कीचक महाराजांचा शब्द मत्स्यदेशांत खालीं पडायचा नाहीं, आणि सैरंध्री—

सौदा०—तें सगळें खरें—पण सैरंध्री कबूल नाहीं, आणि आमच्या बाई-साहेबांचाहि तितका आग्रह काल नव्हता; पण आज—

मैत्रे०—आज काय झालें?

सौदा०—अनुकीचकांनीं कीचक महाराजांचे मनांत भरवून दिलें आहे कीं, कीचकानुकीचकांचें वर्चस्व सुदेष्णाराणीसाहेबांना आवडत नसल्यामुळें कीचक महाराजांचा उपमर्द करण्याकरितांच सैरंध्रीला पाठवून दिली नाहीं. असें ऐकून प्रधानजी राणीसाहेबांना विनंति करीत होते, कीं सैरंध्रीला जर आपण होऊन पाठवून दिली नाहीं, तर अधिराजांच्या उघड अपमान करून व एकेरीनें बोलून, सर्वांदेखत सैरंध्रीला नेण्याचा कीचक महाराजांचा विचार ठरला आहे.

मैत्रे०—मग सुदेष्णा राणीसाहेब घाबरून गेल्या असतील!

सौदा०—हें काय विचारावें! महाराणीसाहेब कीचक महाराजांची समजूत करण्याकरितांच त्यांच्याकडे गेल्या आहेत.

मैत्रे०—समजूत कसली! सैरंध्रीला पाठवून दिली म्हणजे झालें. सैरंध्री आहेच तशी सुंदर—

सौदा०—तुमच्यासारख्या बुढ्या ब्राह्मणाचे तोंडून जर तिची इतकी तारीफ तर कीचक महाराज तिच्या नादीं लागले ह्यांत आश्चर्य नाहीं!

मैत्रे०—मी नाहीं सैरंध्रीची वाखाणणी करीत! कंकभटासारखा दासीबिसीच्या फंदांत पडणारा हा गडी नव्हे!

सौदा०—मग सैरंध्रीची इतकी विचारपूस कशाला?

मैत्रे०—मी कंकभटाला हुडकतों आहें म्हणून तुझ्यापाशीं मी सैरंध्रीची विचारपूस केली.

सौदा०—कंकभटाला पाहावयाला निघाल्यानें सैरंध्रीचा तपास काय म्हणून करायचा?

मैत्रे०—त्यांतलें असें आहे, सैरंध्री जेथें आहे तेथें कंकभट असलाच पाहिजे. आणि मी उघड त्याचा पत्ता काढूं लागलों तर तो कांहीं मला थांग लागूं देणार नाहीं.

सौदा०—कां?

मैत्रे०—कारण, आपल्या चोरट्या कमांत पुरुषांना त्यांच्या सोबत्यांनीं पकडलें असतां डोकें मारल्यासारखें वाटून ते खजील होतात, आणि असल्या गुप्त कामांत बायका शेजारणीपाजारणीची होईल तितकी टाळाटाळी करीत असतात.—म्हणून म्हणतों, कंकभट माझें तोंड चुकाविणार, आणि सैरंध्री तुला टाळणार. तेव्हां असें करूं कीं, मी सैरंध्रीचा तपास करतों आणि तूं कंकभटाला शोधून काढ, म्हणजे आपोआप दोघांचाहि तपास लागेल. चल! (जातात.)

---

# प्रवेश ३ रा.

**स्थळ**—महालक्ष्मीचें देवालय, **कंकभट, बल्लभ, सैरंध्री** बोलत आहेत.

**कंक०**—द्रौपदी, आम्हां पांडवांची शक्ति केवढी मोठी असली, तरी आज त्याचा काय उपयोग ! आमचें पूर्वीचें वैभव आठवावें आणि डोळ्यांतून पाणी काढावें, ह्यापलीकडे आजच्या आमच्या स्थितींत आम्ही काय करूं शक-णार ? जरासंधाला ज्यानें सहज लीलेनें मारलें तो एकटा भीम सर्व कौरवांना पुरून उरण्याइतका बली आहे—पण आज आपण होता—असेंच म्हटलें पाहिजे. पांचाली, तुझ्या स्वयंवराच्या वेळीं ज्या अर्जुनानें सर्व कौरव व इतर राजे ह्यांचा समाचार घेतला, राजसूय यज्ञाचे वेळीं ज्या धनुर्धरानें सर्व पृथ्वी पादाक्रांत केली, वनवासांत असतांना ज्यानें गंधर्वांचा मद उतरून सुयोधनाला सोडवून तुझ्या देखत सर्व कौरवांना खालीं माना घालावयास लाविलें, तोच महारथी आज हातांत कांकणें भरून बसला आहे! आमचें सामर्थ्य उघडपणें दाखवि-ण्याचे दिवस परमेश्वर आणीतों, सर्व मानापमान मुकाट्यानें गिळणें हाच शहाण-पणाचा मार्ग मी समजतों.

**सैरं०**—महाराज, आपण शांतिब्रम्हाचे सागर आहां, तेव्हां जुलूम करणा-ऱ्यांच्या लाथा सर्वांनीं शांतपणें खाव्या, असें आपणांस वाटतें तें ठीकच आहे. शिवाय वनवास संपल्यानंतर, हल्लींच्या अज्ञातवासांत दुसऱ्याच्या दुःखाची अटकळच आपणांस करतां येईनाशी झाली आहे. आपणांस राजसभेंत बसा-वयास मिळतें, केवळ धर्माधर्माच्या वादविवादांत राजा आपली सल्ला मसलत विचारून जुगाराचे दोन पैसे तोंडावर फेंकतो, एवढ्यावरच संतुष्ट होऊन, इंद्रप्रस्थाच्या सिंहासनाच्या मालकांनीं खुद्द आपल्या बायकोला परक्यांची वाईट रीतीनें दासी होण्यास सांगावें, ह्याहून पांडवांना लज्जास्पद गोष्ट कोणची ?—गुलामगिरींत कांहीं दिवस गेल्यानें गुलामगिरींतच मजा वाटूं लागते, ह्याचें उदाहरण म्हणून, विराटनगरींतील पांडवांच्या वर्तनाकडे आपल्या पुत्रपौत्रांनीं

खोटें दाखवूं नये असें तरी आपण वागलें पाहिजे; एवढीच आपल्या दीन पत्नीची महाराजांच्या पायांपाशीं विनंति आहे.

कंक०—द्रौपदी, कीचकाच्या नाटकशाळेंत तूं जा, असें मी एका शब्दानें तरी बोललें का ?

सैरं०—महाराज, काल जर कौरव हजर असते आणि पांडवांसमोर ह्या द्रौपदीला आपली नाटकशाळा करण्याची कीचकानें केलेली प्रतिज्ञा जर त्यांनीं ऐकली असती, तर पांडवांना अज्ञातवासांत ठेवण्याचें सार्थक झालें, असेंच त्यांना वाटलें असतें.—महाराज, भरसभेंत त्या हलकट दुःशासनानें माझा पदर ओढला, त्या वेळीं मी द्यूतांत जिकलेली दासी होतें, असें आपणांस वाटलें, म्हणून आपण कपाळावर हात मारून गप्प बसलां; पण काल मी कांहीं गुलाम नव्हतें किंवा आपणहि गुलाम नव्हतां—

कंक०—द्रौपदी आपण अज्ञातवासांत आहोंत हें तूं विसरूं नकोस.

सैरं०—म्हणूनच म्हणतें, आजची आमची स्थिति पाहून कौरवांना आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं.—महाराज, बारा वर्षें सोडून जन्मभर वनवास आला तरी पुरवला, पण हा अज्ञातवास—

कंक०—द्रौपदी, आपल्या पापामुळें एकदां आपण स्वस्थानापासून भ्रष्ट झालें म्हणजे वनवासाच्या यातना मनुष्याच्या कपाळीं लिहिल्या असतात. ह्या वनवासांत तो हुषारीनें वागला, म्हणजे अज्ञातवासाचीं सुखें त्याला मिळतात. ह्या अज्ञातवासाचे दिवस अक्कलहुषारीनें व आपली धर्मवृत्ति कायम ठेऊन त्यानें काढले, म्हणजे पुन्हा तो आपल्या पहिल्या स्थितीला जातो. संसाराचें रहाटगाडगें असें आहे.

सैरं०—महाराज, वनवासांत आपण पूर्वी कोण होतों, काय होतों, ह्याची आठवण तरी विसरून जावी लागत नाहीं. पांडव वनवासांत असतांनाहि पूर्वीप्रमाणेंच सर्व जगाला आपल्या तेजानें थक्क करून सोडीत असत. पण आज आपली स्थिति काय आहे ?—इंद्रप्रस्थाच्या सिंहासनाचे मालक आम्ही, असे शब्द प्रसिद्धपणें तोंडावाटे काढण्याची मोकळीक तुम्हाला आहे काय ?—

तुमच्या बायकोकडे वांकड्या नजरेनें पहाणाऱ्या जयद्रथाला पांच पाट काढून, गुलाम बनवून, फजित करून, आपल्या बहिणीकडे पाहून जसें तुम्ही जिवदान दिलेंत, तसा पराक्रम करून दाखविण्यास "द्रौपदीपति," "द्रौपदीपति" म्हणून तो नरपशू मिरवीत असतांना तुम्ही पुढें कां सरसावलां नाहीं?—महाराज, वनवास जन्मभर पुरवला, पण पांडवांच्या सर्व सद्गुणांचा लोप करणारा हा अज्ञातवास एक क्षणभरहि नको. वनवासांत केवळ शरीराचे हाल होतात. महाराज, शरीर काय जसें ठेवावें तसें रहातें; पण ह्या अज्ञातवासांत मनाचे हाल होतात. पांडवांचा अज्ञातवास म्हणजे पांडवांनीं स्वखुषीनें, आपली पूर्वीची थोरवी विसरून जाऊन, दुसऱ्याच्या सत्तेखालीं राहण्याचें क़बूल करणें होय. महाराज, स्वातंत्र्याचा आस्वाद घेणाऱ्या मनानें दोन दिवस स्वखुषीनें गुलामगिरींत घालविले, तर तत्काळ तें मन लेचेंपेचें होऊन मानापमान त्याला कळेनासा होतो; किंबहुना अपमान सहन करणें व पूर्वपीठिका विसरून जाणें, हाच सद्गुण असें त्याला वाटूं लागतें!—पांडव वनवासांतून सरळ हस्तिनापुराला गेले असते, तर शरिरानें दुबळे पण मनानें खंबीर असे कौरवांना दिसून, आमच्या शत्रूंना आमची भीतीच वाटली असती. पण महाराज, राजमंदिरांतील नोकराचाकरांना मिळणाऱ्या सुखाला लालचावलेले आजचे पांडव शरिरानें तुकतुकीत पण मनानें षंढ झालेले पाहून कौरव आनंदानें टाळ्या पिटतील!

कंक०—द्रौपदी, कीचकाच्या नाटकशाळेंत तूं जावेंस—

बल्ल०—दादा, कीचकानें द्रौपदीला नाटकशाळेंत ठेवणार म्हणून म्हटल्याबरोबर, तुम्ही गप्प कसे बसलां?—हा भीम जर काल हजर असता, तर जरासंधाला उभा चिरून एका जरासंधाचे दोन जरासंध जसे मीं केले, त्याप्रमाणेंच एका कीचकाचे दोन कीचक केले असते.—पांचालीनें मला कालची हकीकत सांगितली, त्या वेळीं कीचकापेक्षां तुमचा राग मला अधिक आला. कीचक काय सांगून सवरून महा अधम, सूतपुत्र, महापशू तो; पण त्या हलकटाचें उद्दामपणाचें वर्तन तुम्ही कसें सहन केलेंत?—दादा, तुमचें स्वतःचें

छत्र त्या पशूच्या डोक्यावर धरलेलें पाहून तुमचें रक्त संतापानें ज्या अर्थी तापलें नाहीं, त्या अर्थी इंद्रप्रस्थाच्या छत्राला पांडव लायकच नाहींत असें मी समजतों.—आम्ही पांडव जिवंत असतांना, त्या सूतपुत्र कीचकानें 'द्रौपदीपति' म्हणून मिरवावें हं ? दादा, धिःकार असो तुमच्या धर्माला आणि शांत शीलाला !

कंक०—भीमा, शांत हो. ह्या वेळीं क्रोधाच्या तडाख्यांत सांपडून अविचारानें व अधर्मानें आम्ही बिलकूल वागतां कामा नये. आमचें सुदैवच म्हणून, भीमा, तूं कालच्या समारंभांत हजर नव्हतास.—तो नरपशू कीचक भीम हीं अक्षरें केवळ आपल्या टांचेखालीं टेंचतो, पण खरी वेळ आली म्हणजे भीमाच्याच लत्ताप्रहारानें त्या धर्मभ्रष्टाचा कपाळमोक्ष होणार, हें मला पक्कें दिसत आहे. पण द्रौपदी, आजची वेळ रागावण्याची नव्हे.—भीमा, आज संतापानें चिडून, उघडकीस येऊन, सुकुमार द्रौपदीनें पुन्हा वनवासांत जावें ही गोष्ट मला बिलकूल पसंत नाहीं. आजचा काळ जसा मला दिसत आहे तसाच पुढचाहि स्पष्ट दिसतो आहे,—

बल्ल०—मग काय, द्रौपदीनें कीचकाच्या नाटकशाळेंत जाऊन आपली काया भ्रष्ट करून घ्यावी असें म्हणतां ? आज हा अपमानकारक जुलूम सोसून, पुढें कधींकाळीं इंद्रप्रस्थाचें राज्य कौरवांपासून घेऊन तरी काय करावयाचें आहे ? दादा, मी तुमचा धाकटा भाऊ झालों, ह्याची मला इतकी शरम वाटते कीं, ह्या असल्या जगण्यापेक्षां अग्निकाष्ठ खाऊन मेलेलें पुरवलें !—द्रौपदीला कीचकानें भ्रष्ट केली म्हणून सर्व दुनिया छीः थुः करीत असतांना, युधिष्ठिर महाराज आपली प्रतिज्ञा पूर्ण करून इंद्रप्रस्थाच्या सिंहासनावर चढूं पाहतात काय ?—दादा, अजातशत्रू म्हणून कांहीं अग्निहोत्री आपला गौरव करितात, पण ज्यांना आपल्या बायकांवर जुलूम झाला असतांहि राग येत नाहीं, धिःकार असो त्यांच्या त्या अजातशत्रुत्वाला !

कंक०—(भीमा, माझें बोलणें तरी ऐकून घेशील कीं नाहीं ? आज आपल्याला इतकें चिथरून जाण्याचें कांहीं कारण नाहीं.) पांडवांना दुसऱ्याच्या

सत्तेखालीं निमूटपणें दिवस काढण्याचें टाऊक नव्हतें. अज्ञातवास कबूल केल्यानें दुसऱ्याची सत्ता स्वखुषीनें पांडवांनीं कबूल केल्यासारखी आहे. अशा स्थितींत जुलूम होत असला तरी उघडपणें आडदांडपणानें वागणें योग्य नाहीं। पुढच्या उत्कर्षावर दृष्टि ठेवून आजचे वाईट दिवस आम्हांस कसे तरी कंठावयाचे आहेत.–द्रौपदी, तूं अशी खिन्न होऊं नकोस. हा बढाईखोर कीचक कितीहि बडबडला, तरी खरोखर त्याच्या नाटकशाळेत जाण्याचा प्रसंग तुला येईलसें मला वाटत नाहीं.–महाराजा विराट उदारबुद्धीचा व कोमल अंतःकरणाचा असून महाराणी सुदेष्णा आपल्या सद्गुणांमुळें सर्व प्रजाजनांना प्रिय झालेली आहे.–द्रौपदी, शाब्दिक अपमान सांप्रतच्या स्थितींत आम्ही मुकाट्यानेंच गिळले पाहिजेत. पण तो दुष्ट कीचक आपल्या शब्दाप्रमाणें खरोखरच वागण्यास जर प्रवृत्त होऊं लागला; तर सुदेष्णेचीं आर्जवें कर, पायां पडून महाराणीच्या सत्यनिष्ठेवर व औदार्यावर अवलंबून रहा म्हणजे कीचकापासून तुला त्रास होणार नाहीं. [ पडदा.

## अंक पाहिला समाप्त.



# अंक २ रा.



## प्रवेश १ ला.



**स्थळ**—राजमंदिरांतील पटांगण. राणी **रत्नप्रभा**, **मैत्रेय** आणि मंद-हासिनी प्रवेश करितात.

**रत्न०**—अहो मैत्रेय भटजी,—

**मैत्रे०**—आज्ञा बाईसाहेब!

**रत्न०**—स्वारी कोणीकडे आहे?

**मैत्रे०**—कीचक महाराजांची का विराट महाराजांची?

**रत्न०**—तिकडची म्हटलें हो!

**मैत्रे०**—तिकडची स्वारी इकडे आहे.

**रत्न०**—इकडे म्हणजे?

**मैत्रे०**—इकडे म्हणजे तिकडे!

**रत्न०**—सुदेष्णाबाईसाहेबांना सांगितलें पाहिजे, कीं त्यांच्या दिमतीच्या माणसांना सरळहि बोलायला येत नाहीं.

**मंद०**—मैत्रेयभटजी, कीचकमहाराज कोणीकडे गेले आहेत, म्हणून बाई-साहेब विचारताहेत हो.

**मैत्रे०**—अग, तें तुझ्यासारख्या दासींना ठाऊक असणार!—राजवाड्यांत आल्यावर सैरंध्रीचा कीचकमहाराज शोध करतात, का सौदामिनीची थट्टा करतात, का ह्या मंदहासिनीशीं हांसतात, आह्माला काय माहीत?—शिवाय राणीसाहेब, असें आहे, कीचकमहाराजांची स्वारी राजमंदिरांत आली म्हणजे सूर्याला भिऊन जसें घुबडांनीं लपून बसावें, तशा ह्या सगळ्या दासी कोठें तरी लपून बसतात; आणि मग महाराजांची स्वारी अमक्याच ठिकाणीं होईल आणि अमक्याच ठिकाणीं होणार नाहीं त्याचा कांहीं नेम नाहीं!

रत्न०—अग, मंदहासिनी तूंच जरा दोन पावलें पुढें हो आणि शोध घे, स्वारी वन्संच्या महालाकडे झाली कीं नाहीं ती !

मैत्रे०—आणि हें पहा कीचकमहाराजांनीं सुदेष्णाराणीसाहेबांच्या महालांत पाय टेविला कीं तावडतोब मला वर्दी दे. आज महाराजांकरितां आमच्या बाईसाहेबांनीं साखरपाण्याचा बेत केला आहे. आणि मलाहि हजर राहण्याचा हुकूम झाला आहे. म्हणून म्हणतों–ए हांसरे,–पानें ठेविलीं कीं अगोदर मला हांक मार. [ मंदहासिनी जाते ]

रत्न०—मैत्रेयभटजी, मी एक तुम्हाला प्रश्न विचारतें; बालबोध भाषेनें सरळ उत्तर द्याल ना ?

मैत्रे०—अगदीं बालबोध आणि सरळ उत्तर देतों.—बायकांच्याकरितां सरळ,–सोपी,–आणि बालिकाबोध–भाषा कशी वापरावी, हें म्हणजे माझ्या हाताचा मळ आहे. बाईसाहेबांना ठाऊकच आहे कीं, राणीवसांत लिहावयाला वाचावयाला शिकविण्याचे कामीं पूर्वीं महाराजांनीं माझीच योजना केली होती. बाईसाहेबांनीं प्रश्न विचारावा; बालिकाबोध–करपल्लवी–उत्तर पाहिजे असेल तर तसें देईन; तरुणीबोध–नेत्रपल्लवी–भाषा पाहिजे असेल, तर तशी वापरीन; वृद्धाबोध–दंतपतनी–पाहिजे असेल तरी माझी ना नाहीं. कारण वेश्येप्रमाणें भाषा माझ्या मागें हात धुवून लागली आहे !

रत्न०—तुम्ही मार्मिक पंडित आहांत, म्हणून विचारतें, खरें खरें मत सांगा हं. ती सैरंध्री दासी माझ्यापेक्षां सुंदर आहे का ?

मैत्रे०—बाईसाहेबांनीं तेवढे हिऱ्यामोत्यांचे दागिने मजपाशीं काढून ठेवावे म्हणजे मग मी मत देईन.

रत्न०—तें कां ?

मैत्रे०—अहो, आम्ही गरीब दरिद्री माणसें, श्रीमंतांच्या बायकांकडे पाहतांना, त्यांच्या पोषाखाकडे आणि दागिन्यांकडेच आमची नजर जाते.–रूपाकडे जातच नाहीं.–बाईसाहेबांचे दागिने आणि सैरंध्रीचें रूप हीं आमच्या डोळ्यांत भरलेलीं !

रत्न०—बरें, सैरंध्रीच्या आंगावर जर हे दागिने घातले, तर ती माझ्याहून चांगली दिसेल काय?—तिकडचें मन सैरंध्रीवर कां बसावें? मला खरें खरें सांगा हं!

मैत्रे०—बाईसाहेब, मी काय सांगूं? आम्हां पुरुषांची जात अशी गाजरपारखी आहे, कीं एखाद्या हिडिंबेवरच प्रसन्न व्हायची! त्रिभुवनांत सुंदर म्हणून नांवाजलेली द्रौपदीसारखी बायको असतांनाहि राजपुत्र भीमाचा हिडिंबेचा नाद सुटला नाहीं, हें आपण कर्णोपकर्णी ऐकलेंच असेल.—आणि बाईसाहेब, आपणच मनाशीं विचार करा, कीं पुरुषांना जर रूपाची खरी पारख असती, तर चेहरे रंगविण्याचा आणि दागिने घालण्याचा इतका अट्टाहास बायकांनीं केला असता काय? [ सौदामिनी येते. ]

सौदा०—अहो मैत्रेय भटजी, सैरंध्रीला कोठें पाहिलीत का?

रत्न०—सौदामिनी, वन्मग काय करीत आहेत?

सौदा०—बाईसाहेब आपलीच वाट पहात आहेत. कीचकमहाराजांची स्वारी केव्हांच आली! [ मंदहासिनी येते ]

मंद०—बाईसाहेब, महाराज आपल्याकरितां खोळंबून बसले आहेत.

रत्न०—चला मैत्रेयभटजी, मीहि आमंत्रण देतें तुम्हाला.

( मंदहासिनी व रत्नप्रभा जातात. मैत्रेय जाऊं लागतो. )

सौदा०—अहो मैत्रेयभटजी, जरा थांबाल कीं नाहीं? खायच्या गोष्टी निघाल्या म्हणजे म्हातारपण नाहींसें होऊन तरुणासारखे लागले उड्या मारीत जायला!

मैत्रे०—थांबून काय करावयाचें आहे?

सौदा०—अहो सैरंध्री कोठें आहे तें अगोदर सांगा. कीचकमहाराज येऊन पानावर देखील बसावयाची वेळ झाली, आणि हिनें आपलें तोंड चुकविलें!

मैत्रे०—वाढायला, वारा घालायला, आणखी काय दासी कमी आहेत! तोंड चुकविलें तर चुकविलें.

सौदा०—पण बाईसाहेबांनीं तिला हुडकून आणायला मला सांगितलें आहेना!—या सैरंध्रीला अक्कलच नाहीं. कीचकमहाराजांची आवडती नाटक-

शाळा होण्याचा योग, पण हिच्या नशिबी कोठें आहे ? देव देतो आणि कर्म नेतें !–शिवाय मी म्हणत होतें, ही एकदां कीचकमहाराजांच्या नाटकशाळेंत शिरली, म्हणजे पायंडा पडला; एकीमागून दुसरी.

मैत्रे०—अग मग सैरंध्रीला कशाला हुडकतेस ? वेडी कुठली ! आजचे मेजवानीचे वेळीं तिचें काम तूंच कर, आणि कीचकमहाराजांचे पुढें पुढें हो.– समजलीस, आयती ती कोठें नाहिंशी झाली, तुझ्या पथ्यावरच पडलें.–हें बघ, कांहींतरी पक्वान्नें वाढायला घेऊन, पुढें पुढें हो. चल; मला आग्रह करून यथेच्छ वाढ, म्हणजे कीचकमहाराजांपाशीं तुझी अशी शिफारस करीन कीं, त्यांची तुझ्यावर मर्जी बसावी.

सौदा०—आजचीं पक्वानें फारच चांगलीं झालीं आहेत !—तुम्हाला पोटभर वाढीन.—कीचकमहाराजांपाशीं माझ्या सौंदर्याचें वर्णन कसें कराल, सांगा पाहूं.

मैत्रे०—तुझें हाडकाचें व नासक्या कुसक्या रक्ताचें शरीर, राट खरबरीत कातडीनें मढविल्यासारखें मनुष्यांचे डोळ्यांना दिसलें तरी वास्तवीक तूं आंतून बाहेरून नुसत्या लावण्याच्या बनाविलेल्या अप्सरेची पुतळी आहेस, असें कीचक-महाराजांसारख्या दिव्य पुरुषांना वाटलें पाहिजे,——

सौदा०—असल्या बोलण्यानें पोटभर पक्वान्नें मिळत नसतात म्हटलें !

मैत्रे०—तुझा निस्तेज फटफटीत चेहरा इहलोकीं क्षयरोगी दिसला तरी तो परलोकीं चंद्रासारखा दिसेल; व तुझ्या तोंडांतून घाणेरडी लाळ पडत असते असें लुच्चे लोक म्हणत असले तरी प्रेमी जनांच्या अधराचा स्पर्श होतांच त्या लाळेचें अमृत झाल्यावांचून रहाणार नाहीं असें मी कीचकमहाराजांना सिद्ध करून देईन,—

सौदा०—आणि समजलांत का भटजी, आजची फळफळावळ लांब दूर असलेल्या बागांतून आणविली आहे.—असल्या वर्णनानें ती फळफळावळ दृष्टीस पडत नसते बरें !

मैत्रे०—तुझ्या डोळ्यांना चिपडें असून ते नेहमीं मिटल्यासारखे दिसतात,

अशी फाजील तरुणांची तक्रार असली, तरी विचारी लोकांना तुझे डोळे मदनांच्या बाणांचा बंद केलेला मोठा भाता आहेत, असेंच वाटतें;—

**सौदा०**—पुरे झाला हा चारगटपणा, चला आतां ( हात धरून ओढीत नेतांना ) खादीला!—आज तुम्हाला इतकें वाढीन कीं पानावर टाकूनच उठावें!

**मैत्रे०**—तरुणांचें मन कसें आकर्षण करावें हें तुला माहीत नसलें, तरी वृद्धांचा हात धरून जाण्यांत तूं मुरलेल्या म्हातारीहूनहि अधिक सुग्रीण आहेस; अशी आतांच्या स्वानुभवावरून कीचकमहाराजांपाशीं मी तुझी शिफारस करीन.

[ जातात. ]

## प्रवेश २ रा.

[ **विराट, कीचक,** फराळास बसले आहेत; एकेक दासी प्रत्येकाला वारा घालीत आहे. **कंकभट** व **मैत्रेय** बसले आहेत. **सुदेष्णा, रत्नप्रभा, मंदहासिनी, सौदामिनी** उभ्या आहेत. ]

**सुदे०**—बल्लभ, झालें का वाढप सगळें? [ बल्लभ बाहेर येतो. ]

**बल्ल०**—झालें महाराज.

**सुदे०**—अरे आजचीं पक्वान्नें नीट तयार केलीं आहेस ना? आज तुझ्या परीक्षेचीच वेळ आहे. कीचकमहाराज नुकतेच हस्तिनापुराहून परत आले आहेत; तेव्हां त्यांनीं नांवें ठेवतां कामा नाहीं समजलास.

**बल्ल०**—दुर्योधनमहाराज केव्हां केव्हां इंद्रप्रस्थास युधिष्ठिर महाराजांना भेटण्याकरितां येत असत; त्यांना असले पदार्थ मी चारीत असें. आणि मग त्यांना जशी जन्माची आठवण रहात असे, तसाच कीचकमहाराजांकरितां बेत ठेविला आहे महाराज!

**सुदे०**—सर्व वाढून झालें.—दादाला बसायला सांगावयाचें होतें.

**विरा०**—बसायचें कीचकमहाराज.

**सुदे०**—मैत्रेयभटजी, हं, आरंभ करा!

मैत्रे०—कंकभट, हं, पाहतां काय ?

सुदे०—आतां वाट कोणाची पहावयाची ?—बसायचें होतें दादा.

विरा०—आरंभ करावयाचा महाराज.

कीच०—पण ती कोठें आहे ?—मघापासून तुला अक्का सांगतों आहे कीं, तिच्याशिवाय आपण एका पदार्थालाहि हात नाहीं लावणार.—ती येऊंदे मग बसूं.—तोंपर्यंत बसत नाहीं.

सुदे०—रत्नप्रभा राणीसाहेब तर येथेंच उभ्या आहेत हो! दादा,—नवराबायकोचें तुमचें इतकें प्रेम आहे, हें नव्हतें मला माहीत!—राणीसाहेब, जरा आपण दादाजवळ उभें राहावयाचें. आपण जवळ नसलां म्हणजे दादाचा घांस खालीं उतरत नाहीं हो!

विरा०—नवराबायकोचें प्रेम असावें तर असेंच असावें!—धन्य कीचक-महाराज, धन्य रत्नप्रभा राणीसाहेब!

मैत्रे०—महाराज, हस्तिनापुरास असतांना घशांत घांसबीस अडकून नाहींना बसले ?

कीच०—अधिराज विराटमहाराज,—सुदेष्णाराणीसाहेब,—हिच्याकरतां मी खोळंबून बसलों आहे, असें का तुम्हाला वाटतें ?—अक्का, चार दिवसापूर्वी मी तुझ्यापाशीं तुझी सैरंध्री मागितली होती; पण ह्या चार दिवसांत पहातों तों, माझ्या मागणीची कोणाला आठवणहि राहिली नाहीं!—त्रिगर्तांच्या केलेल्या पराभवाची आठवण ताजी होती, त्या वेळीं मला काय आवडेल याचा अंदाज बांधून, माझा शब्द—उत्पन्न होण्याच्या अगोदरच—झेलला जात असे.—मी आठ दहा महिनेच कायतो मत्स्यदेशांत नव्हतों, एवढ्या अवकाशांत माझ्या शब्दाची किंमत इतकी कमी झाली हं!—काल मला साखरपाण्याला आपण—महाराणीसाहेब—बोलवायला आलां, त्या वेळीं मीं पुन्हा सैरंध्रीबद्दल मागणी केली, व साखरपाण्याला पाटावर बसण्यापूर्वी, माझी दासी म्हणून, सैरंध्री जर माझ्या हवालीं करण्यांत येणार असली, तरच मी येईन; नाहीं तर येणार नाहीं; असेंहि महाराणीसाहेब, आपणांस मी बजावलें.—त्या वेळीं, महाराणीसाहेब,

आपण काय उद्धार काढिलेत, ते आपणास आठवत नाहींत काय ?—मी पाटा-वर पाय ठेवल्यापासून सैरंध्री माझी होईल, मेजवानीचे वेळीं माझ्या सेवेला माझी दासी म्हणून सैरंध्री तत्पर राहील व सासरपाण्याहून परत जातांना सैरंध्रीला मीं बरोबर घेऊन जावें, असें महाराणीसाहेब, आपण आमंत्रणाचे वेळीं वचन दिलें होतें.

सुदे०—होय, वचन दिलें होतें, आणि फराळ झाल्यावर सैरंध्रीला मी आपल्या हवालींहि करणार आहें.

कीच०—फराळ झाल्यावर !—मी पाटावर पाय ठेवल्यापासून सैरंध्री माझी झाली पाहिजे.—कोठें आहे ती !—ती दृष्टीस पडल्याशिवाय आम्ही एकहि पदार्थाला हात लावणार नाहीं.—कोठें आहे ती !—काय, नाहीं येत !—दहा महिन्यांपूर्वी मत्स्यदेशांत माझा असा अपमान होत नव्हता.—पाटावर पाय ठेवल्याबरोबर सैरंध्री माझ्या सेवेला हजर राहील म्हणून काल वचन, आणि आज येथें येऊन बसलों तों, हा धटिंगण बल्लभ वाढायला आमच्यापुढें उभा !—जा, असल्या धटिंगणानें वाढलेले पदार्थ आम्ही खात नसतों—(ताट दूर लोटतो.)

विरा०—असें काय कीचकमहाराज ? तिच्या हातून जर कांहीं अपराध झाला असला, तर फराळानंतर त्याचा विचार करूं.

मैत्रे०—वाढलेलें अन्न लोटून देऊं नये.

कंक०—अन्नं ब्रह्मेति व्यजानात्. अन्नाचा शाप बाधल्याशिवाय रहात नाहीं.

कीच०—गप्प बसा भटुर्ग्यांनो; तुम्हाला ह्या थोर श्रीमंतांच्या गोष्टी काय होत ? ज्यांना दुसऱ्यांचीं अर्जवें करून, भिक्षा मागून, अन्नाचे दोन घांस मिळवावयाचे असतात, त्यांनीं पाहिजे तर अन्नाला डोक्यावर घेऊन नाचावें.—तुमचा जन्म अन्नाकरतां आहे; आणि अन्नच काय, जगांतील सुखोपभोगाचे सर्व पदार्थ मजकरितां आहेत.—ह्या अन्नाची मजपुढें प्रतिष्ठा काय !—ज्याच्या बाहुबलानें राजे, महाराजे, अधिराजे, उत्पन्न होतात, हुकमाचे शब्द ज्याच्या मुखांतून निघण्याचा अवकाश कीं त्या बरोबर अभिषिक्त राजे, महाराजे, अधि-राजे, ह्यांना आपल्या वडिलोपार्जित सिंहासनावरून निमूटपणें खालीं उतरावें

लागतें, नवीन राज्यें भरभराटीस आणणें आणि जुनीं नांवाजलेलीं लयास नेणें, ही ज्यांची रोजची सहज लीला, असल्या मजसारख्या वीर पुरुषांच्या पुढें विश्वांतील सर्व सुखोपभोगाचे पदार्थ हात जोडून सेवेला तत्पर उभे राहिले पाहिजेत.–सुदेष्णा महाराणीसाहेब, जबरदस्तीनें इंद्राला स्वर्गांतून हाकून लावून, इंद्राणीला जवळ ओढून घेऊन, स्वर्गाच्या सिंहासनावर बसण्याची माझी योग्यता असताहि केवळ पूर्वपरंपरेला मान द्यावा म्हणून, आणि एकदां मी चुकून आपणांस बहीण असें म्हटलें तें सदोदितचें खरें व्हावें म्हणून, मी त्रिगर्तांचा पराभव केला व मत्स्य देशाच्या सिंहासनाचें पुनरुज्जीवन केलें. विराट महाराजांच्या आणि महाराणीसाहेब आपल्या मस्तकावर मी पुन्हा राज्याभिषेक केला, आणि काल परवां भरतेश्वराकडून विराट महाराजांना अधिराज ही पदवी मी आणिली.—याप्रमाणें चुकून माकून तोंडांतून निघालेला शब्द देखील मी खरा करून दाखवीत असतां, एक यःकश्चित् दासी मी मागावी, आणि तिला द्यायला तुमच्या जिवावर यावें; फार चांगली कृतज्ञता, फार चांगली कृतज्ञता!—अक्का, माझी इच्छा आहे,–मी मागतों,–आमचा हुकूम आहे,–सैरंध्रीनें हें ताट उचलून नेऊन, आम्हाकरतां आपल्या कोमल हातानें दुसरें ताट वाढून आणलें पाहिजे; आणि आमचा फराळ चालला असतां, आम्हाजवळ उभे राहून आम्हांला वारा घातला पाहिजे.–कोठें आहे सैरंध्री?–सैरंध्री?–नाहीं येत?–उठलों आम्ही तर मग!

**सुदे०**—जरा थांबावयाचें, आणखी पाठवितें हो तिला बोलवावयाला माणूस; सैरंध्री आतां येईल. अग सौदामिनी, सैरंध्री गेली तरी कोठें? तिला लवकर ये म्हणावें.

**सौदा०**—पाकशाळेंत बल्लभानें तिला आपल्या हाताखालीं घेतली आहे, आतां वाढलेल्यापैकीं बरेच पदार्थ सैरंध्रीनें केलेले आहेत म्हणे.

**कंक०**—सैरंध्रीच्या हातचा स्वयंपाक चाखायला मिळावा म्हणून दूरदूरचे महर्षी इंद्रप्रस्थास येत असत.

**मैत्रे०**—हे पदार्थ इतके चांगले झालेले दिसतात कीं माझ्या तोंडाला तर पाणीच सुटलें आहे.–सैरंध्रीचे हात पोटांत न जातां, बल्लभाचे पोटांत गेले तरी आपली तक्रार नाहीं.

रत्न०—मी हें ताट उचलून नेतें आणि पुन्हा दुसरें वाढून आणतें.

कीच०—आपल्या सुंदर हातांचें माहात्म्य आपल्या महालांत; तुझ्या महालांत नसल्यावर आम्ही कांहीं तुझे गुलाम नाहीं.

रत्न०—वायकांची सत्ता सर्व ठिकाणीं सारखीच असते हो.

[ ताट उचलूं लागते. ]

कीच०—खबरदार, जिला जें काम सांगितलें तें तिनें करावें. पट्टराणीचा मान सोडून नाटकशाळेंतील दासी व्हावयाचें आहे वाटते मनांत ?

विरा०—सैरंध्री कीं कोण दासी ती, कीचकमहाराजांच्या आवडत्या दासीला हांक मारा. क्षुल्लक गोष्टीकरतां कसलीं रणें माजवितां आहां ?

बल्ल०—ती स्वयंपाकगृहांत कामांत गुंतली आहे.

सुदे०—सौदामिनी, तूं जा तिच्या जागीं;—आणि तिला इकडे पाठवून दे.

सौदा०—मी तिकडेच जात होतें, पण बल्लभ जाऊं देईना !

मैत्रे०—कायरे बेट्या बल्लभा, तुलारे काय ? हाताखालीं खटपटीला सौदामिनी काय ? सैरंध्री काय ?

कंक०—जरा हुषार माणूस हाताखालीं असलें म्हणजे पाकसिद्धि चांगली होते.

सुदे०—इतकीं चाकर माणसें हाताखालीं आहेत. बल्लभ, सैरंध्रीला दे पाठवून.

मैत्रे०—राजे लोकांनीं करावयाचे हट्ट आचारी पाणक्यांनीं करून कसे चालतील ?—सौदामिनी, तू जा ग पाकशाळेंत ! ( सौदामिनी जाऊं लागते. )

बल्ल०—चल फीर मागें, शेंबडी कोठली !—महाराज, असल्या दासी जर स्वयंपाकगृहांत ढवळाढवळ करूं लागल्या, तर पदार्थ सगळे नासून जातील.—मी नाहीं स्वयंपाकगृहांत हिला पाऊल टाकू देणार.

सौदा०—मी तरी काय करूं बाईसाहेब ?—हुकूम होत असेल तर मी पाहिजे तर कीचक महाराजांना वारा घालीत उभी राहतें. (वारा घालूं लागते.)

कीच०—चल हो दूर टालगज, शेंबडी !—अंगठींत खापरखुंटीचा खडा कोणी बसवीत नसतें !

**सौदा०**—( दूर होत स्वगत ) पुरुषांची जात मेली गाढवासारखी !–जवळ जाऊन आर्जवें केलीं म्हणजे ह्यांनीं लाथा मारल्याच !

**मैत्रे०**—सैरंध्री महाराणीसाहेब पुढें येताहेत, का आम्हाला भरलेल्या ताटावर बसून उपास घडणार ?

**सुदे०**—मीच जाऊन तिला घेऊन येतें.–चलग मंदहासिनी, मजबरोबर चल.

[ सुदेष्णा व मंदहासिनी जातात ]

**कीच०**—विराटमहाराज, आपल्या दरबारांत बायकांचें प्रस्थ फार माजलेलें दिसतें !—यःकश्चित् दासी, आणि तिला बोलवायला सुदेष्णा महाराणीला जाणें भाग पडावें हं !–बायकांचें प्रस्थ कसलें म्हणा !–महाराज मी आपणाला साफ सांगतों, महाराणीच्या असल्या लपंडावानें मत्स्यदेशांत मी कधींच निस्तेज व्हावयाचा नाहीं.–त्रिगर्तांना जिंकण्याची धमक आपल्या घराण्याचे मनगटांत येईतों कीचकाचा अपमान करून आपलें भागावयाचें नाहीं;–

**विरा०**—हे काय भलतेच विचार !–आपला अपमान आम्ही कधीं तरी करूं काय ? सैरंध्री फारच चांगल्या स्वभावाची आणि पोक्त विचाराची बायको आहे.

**कंक०**—आणि म्हणूनच महाराणीसाहेबांचें तिच्यावर प्रेम फार आहे. ( पडद्यांत–बाईसाहेब मी पायां पडतें, पदर पसरून भीक मागतें, ह्या दुष्ट लांडग्याच्या जुलमांतून ह्या गरीब गाईला कसेंहि करून सोडवा. )

**कीच०**—( उठून ) विराटमहाराज, ह्या मत्स्यनगरींत, तुमच्याच मंदिरांत आणि माझ्या नोकरांसमोर मला एखाद्या दासीनें दुष्ट लांडगा म्हणावें, आणि तुम्ही सर्वांनीं चांगल्या स्वभावाची म्हणून त्या दासीची तारीफ करावी; आश्चर्य आहे !–आश्चर्य तरी कसलें ? राणीसाहेब, आतां मला तुमचें कारस्थान समजलें ! सैरंध्रीला प्रथम दूर पाठवून सर्वांदेखत माझा अपमान करावयाचा, आणि पुन्हा त्या दासीकडून माझ्या तोंडावर दुष्ट लांडगा, अशी मला शिवी देऊन सर्व नोकरांच्या दृष्टीनें मला कःपदार्थ करून सोडायचें एवढ्याकरतां हा मेजवानीचा थाट हं !–बस्स, आम्ही येथून आतां चाललों, त्या दासीकडून उघड तोंडावर [illegible] करून घेण्याची वाट पहात बसण्याइतका हा कीचक

मूर्ख नाहीं.–राजा विराट, मत्स्यदेशावर ह्या कीचकाचे केवढे उपकार आहेत, हें ध्यानांत आण, आणि मग माझा अपमान करण्याच्या तुझ्या बायकोच्या साहसाला उत्तेजन दे.–राजा विराट, माझ्या बाहुबलानें तुझें डळमळणारें सिंहासन जर स्थिर झालें नसतें, तर तुझी ही राणी त्रिगर्तांच्या सैन्यांतील एखाद्या क्षुल्लक सारथ्याच्या नाटकशाळेंत आज नाचत राहिली असती.

विरा०—हें काय कीचक महाराज! भलताच संशय!–थोडक्या वेळांत मी आपली खात्री—

कीच०—राजा विराट, माझी शक्ति केवढी प्रचंड आहे, हें नीट लक्षांत घे.–मी मनांत आणलें तर मत्स्यपुरींतील नव्हे, तर सर्व जगांतील पाहिजे ती तरुणी केवळ माझ्या बाहुबलानें मी आपल्या नाटकशाळेंत ओढूं शकतों.—राजा, पांडवांची राणी द्रौपदी हिला आपली नाटकशाळा बनविण्याची ज्या वीराची प्रतिज्ञा, त्याच्यापुढें तुझ्या मंदिरांतल्या दासींनीं "नाहीं" असें उत्तर दिलें असतां, त्याचे काय भयंकर परिणाम होतील, ह्याचा विचार कर. बस्स. आतां मी येथून जातों, आणि चार दिवसाचे आंत सैरंध्री जर माझ्या नाटकशाळेंत रहावयास आली नाहीं,–तर हा आजचा अपमान–मी बोलून दाखवीत नाहीं–नीट विचार करुन काय करावयाचें तें कर. (जातो)

विरा०—हें काय? इतका राग! क्षुल्लक बाब!–चल मैत्रेया, कीचकमहाराजांचें आपण जाऊन शांतवन करूं. (जातो.)

मैत्रे०—(जातांना) सर्व ग्रह आज माझे वाईटच असले पाहिजेत, नाहीं तर पक्वान्नाच्या राशी पुढें पडल्या असतांना नुसत्या डोळ्यांनीं भोजन करण्याचें हें मरण मला कां आलें असतें? (जातो.)

(सुदेष्णा सैरंध्रीचा हात धरुन तिला बाहेर आणते.)

सैरं०—बाईसाहेब, मी पायां पडते,–पदर पसरून मी भीक मागतें,–त्या दुष्ट लांडग्याच्या स्वाधीन ह्या गरीब गाईला करूं नका हो.

सुदे०—हें काय, कीचकमहाराजांची स्वारी गेली वाटतें रागावून!–सैरंध्री, अग, तूं दासी, आणि तुझ्यामुळें कीचकमहाराजांचा अपमान होऊन

त्यांनीं येथून रुसून जावें हें तुला शोभतें का? वहिनी, तुम्ही तरी त्यांना कांहीं सांगावयाचें होतें!–ह्या दासी अशा मस्तवाल झाल्या आहेत, तुमच्या आमच्याहून मेल्यांची मिजास जास्त!–जा, सैरंध्री, अशी जा;–ह्या पावलीं कीचकमहाराजांच्या मंदिराकडे जा,–त्यांच्या पायां पड,–त्यांच्यापुढें नाक घास,– आणि आपली नाटकशाळा होऊन राहण्याकरितां मी आलें आहें, अशी त्यांना हात जोडून विनंति कर.

**सैरं०**—बाईसाहेब, आपणच माझ्यावर अशा रागावलां, तेव्हां मजवर परमेश्वरच कोपला आहे, असें म्हटलें पाहिजे. बाईसाहेब, दुर्दैवाचा प्रसंग ओढवल्यामुळें आलेले वाईट दिवस आपल्यासारख्या साध्वीची नोकरी करून कंठण्याचें माझ्या नशिबीं आलें असलें, तरी धर्म, नीति, अब्रू ह्यांची चाड मला आहे. बाईसाहेब, माझ्या पातिव्रत्याचा भंग करणारें हें नीच काम मला सांगून, बायकांचा दुर्गुण वाढलेला पाहून साध्वींना आनंदच होतो असा आपल्या निष्कलंक कीर्तीचा दुर्लौकिक कां करून घेतां?—बाईसाहेब, सद्गुणां-बद्दलची आपली आवड, धर्मावरची आपली श्रद्धा, आणि अनाथाबद्दल आपला कळवळा, हीं ऐकून मी माझ्या आपत्तीच्या वेळीं आपल्या सावलीला रहा-वयाला आलें. माझ्या पतींना मी अप्रिय होईन अशी कोणचीच सेवा मी करणार नाहीं, आणि कोणच्याहि पुरुषाची दासी होणार नाहीं, अशी मी चाकरीला राहिलें त्यावेळीं आपल्या पायांपाशीं विनंति केली होती; आणि आपणहि आपल्या पाठच्या बहिणीप्रमाणें माझ्या अब्रूचें रक्षण करीन म्हणून मला वचन दिलें होतें;–

**सुदे०**—तें कांहीं नाहीं; सैरंध्री, तुला ह्या पावलीं कीचकमहाराजांच्या नाटकशाळेंत गेलेंच पाहिजे.

**सैरं०**—आपलें वचन आपण विसरून गेलांत, ह्याबद्दल बाईसाहेब, मी आपणांला दोष देत नाहीं—माझें पूर्वजन्मीचें कांहीं तरी भयंकर पातक असलें पाहिजे; नाहीं तर महासाध्वी म्हणून नांवाजलेल्या आपल्यासारख्यांच्या धर्म-भीरु अंतःकरणाला एखाद्या कुंटिणीला साजेल असें हें वर्तन कसें पसंत पडलें असतें!



सैरंध्रीः—मजसारखा प्रसंग पतिव्रता सुदेष्णाबाईसाहेबांवर आला तर त्यांच्या पतींच्या मनाला—आपले मानलेले भाऊ विराट महाराज ह्यांच्या मनाला—किती दुःख होईल याची अगोदर कल्पना करा. [पृ. ३५

कंक०—सुदेष्णा बाईसाहेब, रत्नप्रभा राणीसाहेब, दुःखानें आणि संतापानें सैरंध्रीला सांप्रत घेरलें असल्यामुळें, कीचकमहाराजांसंबंधानें किंवा आपणांसंबंधानें बोलतांना तिच्या तोंडून एखादा अविचाराचा शब्द बाहेर पडला तर आपण ह्या प्रसंगीं तिला माफी केली पाहिजे.—तिच्या विनंतीचा आशय इतकाच आहे कीं, प्रसंगाविशेषीं एखाद्या मनोविकाराच्या जाळ्यांत सांपडून कीचकमहाराजांसारखे प्रतापी पुरुष पापाचरण करण्यास जर चुकून प्रवृत्त झाले, तर त्यांच्या पूर्वीच्या परंपरेनें आलेल्या सद्गुणांकडे त्यांना पुन्हां वळविण्याचें काम आपल्यासारख्या पुण्यशील, धर्मशील, पतिव्रतांच्या हातून सहज होणारें आहे. कीचकमहाराजांना धर्माच्या दोन गोष्टी सांगून त्यांची धर्मबुद्धि पुन्हा पूर्वीच्या सारखी प्रखर करण्याचें पुण्य आपणासारख्या पतिव्रतांच्याच पदरीं पडणें योग्य आहे.

सुदे०—वहिनी, मी मोठ्या बुचकळ्यांत पडलें आहे. दासीकरतां रदबदली केली तर कीचक महाराजांना कितपत रुचेल हें समजत नाहीं. बरें, सैरंध्रीला तरी तिच्या इच्छेविरुद्ध त्यांच्या महालाकडे जा कसें म्हणावें? तुम्हीच सांगा बाई!

सैरं०—रत्नप्रभाराणीसाहेब, सुदेष्णाबाईसाहेब, मत्स्यदेशांत महापतिव्रता म्हणून आपली ख्याति आहे.—मी सांप्रत गरीब स्थितींत असून दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडलें असलें तरी आपल्यासारख्या महासाध्वींचा मनापासून किता गिरवावा अशी माझी इच्छा आहे. (पाया पडून) बाईसाहेब, मी आपलें अनाथ लेंकरूं आहे असें समजा.—रत्नप्रभाराणीसाहेब, माझ्या ह्या बोलण्यानें आपल्या पतीचा मनोभंग होईल, म्हणून आपण मनांत विचार आणण्यापूर्वी मजसारखा प्रसंग पतिव्रता सुदेष्णाबाईसाहेबांवर जर आला तर त्यांच्या पतीच्या मनाला,—आपले मानलेले भाऊ विराटमहाराज ह्यांच्या मनाला,—किती दुःख होईल ह्याची अगोदर कल्पना करा.—सुदेष्णाबाईसाहेब, ह्या गरीब दासीला जो आपण हुकूम करीत आहां तशाच प्रकारची आज्ञा ऐकण्याची वेळ रत्नप्रभाराणीसाहेबांना जर आली तर पतिव्रता ह्या नात्यानें त्यांच्या मनावर दुःखाच्या

मागण्या कशा दिल्यांसारख्या होतील, इकडे लक्ष द्या.–आपण दोघी महासाध्वी व महापतिव्रता आहां. पातिव्रत्याच्या भंगापेक्षां मरणहि कुलीन स्त्रियांना कसें बरें वाटतें हें आपणाइतकें जगांत फार थोड्या स्त्रियांना समजतें. म्हणूनच मी आपणापाशीं पदर पसरून भीक मागतें कीं, एखाद्या दासीला हुकूम करीत आहों असें न मानतां आपणासारख्याच दुसऱ्या एका पतिव्रतेला नाटकशाळा व्हावयास आपण सांगत आहां, ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष करूं नका; आणि पतिव्रता कुलीन स्त्री संकटांत सांपडलेल्या पतिव्रतेकडे ज्या दयार्द्र दृष्टीनें पाहते त्याच दयार्द्र दृष्टीनें मजकडे पहा.—आपण मालक, मी चाकर, हें नातें उदारबुद्धीनें क्षणभर विसरा; कुलीन बायकांची अब्रू कुलीन बायकांनींच होईल तितक्या तजविजीनें संभाळावयाची असते, ह्या स्त्रीजातीच्या सहजधर्माच्या आड आपण येऊं नका; आणि आपल्या ह्या गरीब धर्मभगिनीच्या पातिव्रत्याचें रक्षण करा.

सु०—सैरंध्री ऊठ; उगीच शोक करूं नको. तूं सद्‌गुणी आहेस, शहाणी आहेस, हें मला समजतें; म्हणूनच मी कीचकमहाराजांच्या पहिल्या दिवशींच्या मागणीची टाळाटाळ केली पण ह्या टाळाटाळीनें आपला अपमान होतो असे त्यांनीं उद्गार काढल्याविषयीं मला समजलें, म्हणून मीं काल त्यांना तसें वचन दिलें.–आतां कीं नाहीं ह्या सर्व प्रकरणाला राजकाजाचें स्वरूप येऊं पहात आहे; आणि राजकाजाचा प्रश्न उद्भवला, म्हणजे सद्‌गुणांना कर्ते पुरुष किंमत देत नाहींत, हें तुला माहीतच आहे.

कंक०—राजकाज व धर्मनीति ह्या जोडीनें हातांत हात घालूनच चाललें पाहिजे.–राजकाजानें धर्मबुद्धीची पायमल्ली करतां कामा नये. ह्या गोष्टीची आठवण राजकर्त्या पुरुषांची नाहींशी होऊं नये अशी खबरदारी घेण्याकरतांच आपल्यासारख्या महासाध्वींना महाराणीपदाचा मान देण्यांत येत असतो.–पुरुषांच्या स्वेच्छाचारी मनोवृत्तींना बायकांनीं जर आळा घातला नाहीं, तर पुरुषजातीच्या बरोबर स्त्रीजात उत्पन्न करून पुरुषांना बेलगामी होऊं न देण्याची ब्रह्मदेवाची युक्ति फुकट गेली असेंच म्हणावें लागेल.

सुदे०—कंकभट मला ह्या सर्व गोष्टी कळतात, पण ह्या प्रसंगीं वागावें कसें हेंच समजत नाहीं.

रत्न०—महाराणीसाहेब, मला कीं नाहीं ह्या सैरंध्रीकडे पाहिलें म्हणजे वाईट वाटतें. तिकडच्या म्हणण्याप्रमाणें वागायला जर ही आपखुषीनें तयार झाली असती तर मीहि तिकडच्या इच्छेच्या आड गेलें नसतें; व परमेश्वरानें इतकें सुंदर स्वरूप हलक्या मनाला देण्यापेक्षां दुसऱ्या एकाद्या पतिव्रता कुलीन स्त्रियेला कां दिलें नाहीं म्हणून परमेश्वराची निर्भर्त्सना करीत मी स्वस्थ बसलें असतें. पण हिची धर्मबुद्धि पाहून, मला कीं नाहीं ही खरोखर माझ्या बहिणी-सारखी वाटते.—सैरंध्री, तूं उगीच आतां शोक करूं नकोस.—महाराणीसाहेब चार दिवसांची अवधी तिकडून देण्यांत आली आहे, तेवढ्या अवकाशांत मी तिकडचें मनच बदलून टाकतें, मग तर झालें ना!

सुदे०—रत्नप्रभाराणीसाहेब, आपण मनावर घेतल्यावर काय नाहीं होणार!

(पडदा)

---

## प्रवेश ३ रा.

स्थळ—रस्ता, विद्याधर काखेंत पोथी असा, व सिद्धपांक आचारी हातांत झारा, चंची, व तंबाखू चघळीत असा, प्रवेश करितात.

सिद्ध०—ए विद्याधर, बेट्या इकडे ये, चुकवून जावें म्हणतोस, इकडे ये. चाः असा घाईघाईनें कोठें जातोस?

विद्या०—आलों, काय काम आहे तें लवकर बोल. मला गुरुजींच्या घरीं लवकर गेलें पाहिजे.

सिद्ध०—अरे हो, ठाऊक आहे! म्हणून कांहीं एवढें घाईनें नको जायला!

विद्या०—छे बाबा, दुरूनच बोल, पोथीवर देखील त्या थुंकीचे शिंतोडे उडाले!

सिद्ध०—(पिचकारी टांकून) चुकून असें होतें,—आतां नाहीं उडावयाची.

विद्या०—फार अमंगळ ! स्वयंपाक करतांना कसें होतें रे सिद्धपाक ?

सिद्ध०—अरे, कालच गंमत झाली ! कीचकमहाराजांना एका अनुकीचकाच्या घरीं मेजवानी होती, आणि मांसाच्या तुकड्यांची कढी कढत असतां आमचा मुखरस कढीच्या भांड्यांत असा पडला ! पण कीचक आणि अनुकीचक कढीचे असे प्रेमाने भुरके मारीत होते कीं यंव !

विद्या०—छे बोवा, अगदींच अमंगळ ! गुरुजी म्हणत होते, आतां इतक्यांत कलियुग सुरू होणार म्हणून, तें कांहीं खोटें नाहीं म्हणायचें.

सिद्ध०—मला सुद्धां असेंच वाटतें.—काल—किंवा फार झालें तर आज सकाळीच—नाहीं दोन तीन महिन्यांपूर्वीच—कलियुग सुरू झालें.—दोन तीन महिन्यांपूर्वी पाताळकुरूंतला एक मांत्रिक आमच्या आचारी पाणक्यांच्या अड्यावर आला होता; त्यानें ही ताम्रमुखी पूड आम्हां सर्वांना दिली.—आम्ही पानाबरोबर तोंडांत टाकली; (चिमूट तोंडांत टाकतो) आणि एकमेकांच्या अंगावर अशी थुंकी उडाली ! लगेच त्या पाताळी मांत्रिकानें कलियुग सुरू झाले म्हणून टाळ्या वाजविल्या; आणि काय ? कलियुग लगेच सुरू झालें ! हें कलीयुग सुरूं झाल्यापासून आम्हां आचाऱ्यापाणक्यांना ही ताम्रमुखी पूड खाल्ल्याशिवाय चैनच पडत नाहीं.

विद्या०—कसली ती ताम्रमुखी पूड ! दाखीव पाहूं !—लांबून—लांबून—मला तिचा विटाळ नको—नाहींतर माझ्या अंगांत कली शिरेल.

सिद्ध०—मोठा आला आहे विटाळाच्या गोष्टी सांगायला ? माझी थुंकी नाहींका तुझ्या अंगावर उडत आहे ?

विद्या०—हिला ताम्रमुखी कां म्हणतात ?

सिद्ध०—त्या मांत्रिकानेंच हें नांव सांगितलें. पाताळांतल्या ताम्रांच्या मुखांत हा नेहमीं असते, म्हणून हिला ताम्रमुखी—ताम्रखू—किंवा तंबाखू म्हणतात.—घे, तुला घे, थोडकी—

**विद्या०**—छे! मी शिवणार देखील नाहीं.

**सिद्ध०**—अरे जा, कलियुग जोरांत आलें, म्हणजे तुझे गुरुजी देखील संथा देतांना हीच पूड चघळीत बसतील.—बरें, मी तुला असें सांगणार होतों, काखेंत पोथी मारून तूं शिकत फिरणार किती दिवस! कलियुग सुरू होऊन दोन तीन महिने झाले आहेत. आतां आम्हां आचाऱ्यांना,—किंवा गांवांतल्या दारूविक्यांना—जो मान आहे, तो तुम्हां विद्वान पंडितांना कांहीं मिळणार नाहीं.

**विद्या०**—नाहीं बाबा, आम्हांला कोणी विचारीत नाहीं.—गुरुजी आणि दुसरे मोठमोठे पंडित काल कीचकमहाराजांना आशीर्वाद द्यायला गेले होते. दरवाज्यावर दोन तास त्यांना उभें रहावें लागलें. शेवटीं निरोप आला, कीं इंद्रप्रस्थास धर्मराजाच्या वाड्यांत खाऊन खाऊन पंडितांनीं पांडवांना वनवासास पाठविलें, तसा हा कीचक पंडितांच्या नादाला लागून बुडणारा नव्हे!

**सिद्ध०**—अरे तुम्ही पुष्कळ—पुष्कळ—शिकलां, तरी विचारतो कोण?—कीचकम्हाराजांची पराकाष्ठेचीं आर्जवें केल्यावर, अनुकीचकाच्या हाताखालीं मोठ्या मिनतवारीनें लहानशी वृत्ति मिळावयाची—तेव्हां मी तुला सांगतो, ही पोथी दे फेंकून, आणि हा झारा हातांत घे, नाहीं तर एखादें दारूचें दुकान काढ.

**विद्या०**—आपण आहों जातीचे ब्राह्मण,—आपणाला हें दारूच्या दुकानाचें काम कांहीं झेंपायचें नाहीं.—गिऱ्हाइकांचे बरोबर दुकानदारानेंहि थोडी थोडी घ्यावी लागते म्हणे!

**सिद्ध०**—तुम्हां पंडितांना आम्हां आचाऱ्यापाणक्यांच्या इतकीहि बुद्धि नसते म्हणून म्हणतात, तें कांहीं खोटें नव्हे.—ब्राह्मण असलास तर बंदच असलेल्या शिशा विकीत जा.—दारूचें दुकान काढलेंस, तर खुद्द कीचकाची किंवा अनुकीचकाची मेहेरबानी होईल. तें नाहीं साधलें आणि हा झारा हातांत धरलास, तरी देखील अनुकीचकाच्या पदरीं असलेल्या पंडिताहूनहि अधिक मोटें वेतन तुला मिळेल.—अरे वाः फार वेळ झाला! जातों मी.

विद्या०—एक शब्द !–तुझी बल्लभ आचाऱ्याचे हाताखालीं नेमणूक होणार होती, त्याचें काय झालें ?

सिद्ध०—अरे तूं महापंडित, आणि निजलेल्या मनुष्याप्रमाणें प्रश्न करतोस ! कीचकमहाराज आले त्याच दिवशीं माझी नेमणूक झाली !

विद्या०—आमच्या गुरुजींचें कीचक व अनुकीचक यांजकडे आतां वळण नाहीं; तुझी इतक्या दिवसांची ओळख, तेव्हां मलाहि बल्लभाचे मार्फत कोठें तरी चिकटून दे.

सिद्ध०—आणखी केव्हां तरी माझी गांठ घे, मग विचार करीन.–पण हें पहा, अगोदर ती पोथी फेंकून दे. ( जातो )

विद्या०—हा म्हणतो तें कांहीं खोटें नाहीं. यथा राजा तथा प्रजा. मत्स्यदेशांत विराटमहाराज जर सिंहासनावर बसण्यापुरते राजे होऊन, कीचक व अनुकीचक खरे सत्ताधारी झाले, तर आमच्यासारख्या पोटार्थ्यांनींहि पूर्वींचे अभ्यास सोडूनच दिले पाहिजेत. आतां गुरुजींच्या पुढें ही पोथी ठेवावी, आणि दारूचें दुकान काढूं,–का आचाऱ्याचा झारा हातांत घेऊं,–का सिद्धपाकाचीं अर्जवें करून नौकरी पटकावूं,–म्हणून त्यांनाच विनंति करावी हें बरें. ( जातो )

---

## प्रवेश ४ था.

---

स्थळ—रत्नप्रभा राणीचा महाल, रत्नप्रभा पलंगावर बसली आहे.

रत्न०—मंदहासिनी, अग मंदहासिनी, इकडे ये अशी.

[ मंदहासिनी येते. ]

मंद०—काय आज्ञा आहे बाईसाहेब ?

रत्न०—अग तुला ठाऊक आहे, मी हे दागिने ह्या वेळीं घालीत नाहीं, ह्या फुलांच्या गजऱ्याला रात्रीची शिवत देखील नाहीं;—रोज काग तुम्हाला सांगावें लागतें ! इतकी देखील माणसाला आठवण नसावी म्हणजे काय !

मंद०—बाईसाहेब, महाराज हस्तिनापुराहून परत आले, त्या दिवसापासूनच मी हे दागिने आणि फुलांचा गजरा येथें रात्रीं ठेवूं लागलें.

रत्न०—महालांत स्वारी पक्की होणार, असें समजल्याशिवाय हे दागिने, हे हार माझ्या पलंगापाशीं बिलकूल ठेवूं नको.—आज सहा दिवस झाले गांवाहून येऊन, राजकाजामुळें मेलं माझ्याशीं एक शब्द बोलायचीहि फुरसत नाहीं.—अग हा शृंगार करून करायचें आहे काय?—जा घेऊन सर्व. [ मंदहासिनी दागिन्यांचें तबक व गजरा घेऊन जाते, कीचक दुसरें तबक घेऊन रत्नप्रभेच्या मागें येऊन उभा राहतो.] ज्यांच्याकरितां शृंगार करावयाचा तेच जर जवळ नाहींत तर हे दागिने मेले घेऊन करायचें काय?

कीच०—हा मी तुझ्या जवळ आहें.—आणि हे दागिनेहि दूर गेले नाहींत.

रत्न०—बायकांचा मुख्य दागिना जवळ आल्यावर इतर दागिन्यांची जरूर आहे कोणाला!—हस्तिनापुराहून येऊन इतके दिवस झाले, आज बरी ह्या दासीची आठवण झाली!

कीच०—आठवण झाली नाहीं असें कसें होईल? हस्तिनापुरास सुद्धां ज्या देवतेचें ध्यान एकसारखें आम्ही करीत होतों, तिच्या दर्शनाला यायची आठवण का व्हायला पाहिजे?

रत्न०—मग मेलं माझ्या महालापर्यंत चार पावलें चालायला सहा सात दिवस लागले म्हणायेच!

कीच०—हो लागले खरे!—आपल्या दर्शनाला येण्याकरितां एक एक पाऊल टाकतांना एक एक दिवस विचार करण्यांत घालावा लागतो!—कोणच्या दागिन्याकरितां रत्नप्रभा रुसली असेल, ह्याचा अंदाज बांधून दागिना तयार करवून, दुसरें पाऊल टाकावें, तों तिसऱ्याच दागिन्याची आठवण होते!—तूं न रुसशील असा बंदोबस्त करतां करतांच कित्येक दिवस निघून जातात!

रत्न०—मला धास्ती पडली होती, असा विचार करतां करतां वर्षानुवर्षें निघून जाऊन, सर्व जन्मच जातो कीं काय!

कीच०—प्यारी, इतक्या दिवस तुझ्या महालाकडे आलों नाहीं ह्याचें खरें कारण असें आहे, राजा किंवा देवता ह्यांना रिक्त हस्तानें पाहूं नये, अशी शास्त्राची आज्ञा आहे. आणि तुला माहितच आहे, कीं सार्वभौम भारतेश्वर सुयोधन ह्याला मी राजा मानतों, व तूंच कायती माझी मुख्य देवता आहेस;-खोटें नाहीं बोलत, तुझ्या तोंडावर उगीच स्तुति करतों असें नको मानूं.

रत्न०—नुसत्या बोलण्यावरून माणसाची परीक्षा अल्लड मुली करीत असतात; करणीवरून परीक्षा करावी हें मला आतां समजूं लागलें आहे हो!

कीच०—माझ्या शब्दांवर तूं विश्वास ठेवूं नकोस. (दागीने दाखवून) माझी कृती पाहशील कीं नाहीं? हें तबक तुझ्या दासीनें आतां येथून नेलेलें नव्हे. हा गजरा तुझ्या दासीनें बनविलेलाहि नाहीं.—ये, अशी जवळ ये, बैस, आणि करणी नीट पाहून माझी परीक्षा कर.—हे दागिने मूळचे द्रौपदीचे असून, द्रौपदी कालान्तरानें माझ्या नाटकशाळेंत यावयाची असल्यामुळें हे दागिने—कां तोंड फिरविलें? नापसंत!

रत्न०—आमची आपली बायकांची बुद्धि, मला असें वाटतें सर्व जगांतील श्रेष्ठपणा इकडे यावा, पण गडे दुसऱ्याच्या बायका आपल्या दासी करण्यांत इकडे भूषण वाटूं नये.

कीच०—खुळी, खरोखर खुळीग खुळी! रत्नप्रभे, तुला माहीत आहे, द्रौपदीच नव्हे तर आणखी इतर कसल्याहि अप्सरा माझ्या नाटकशाळेंत आल्या, तरी माझी खरी आराध्यदेवता तूंच.

रत्न०—असें तोंडानें म्हणायचें तेवढें!—रोज नव्या नव्या दासींची नाटकशाळेंत भरती करायची,—आणि आराध्यदेवतेशीं बोलायला पांच पांच सात सात दिवस फुरसतहि नाहीं!

कीच०—सहा दिवस आलों नाहीं हें खरें, पण कारण तर ऐक.—द्रौपदीच्या अंगावरच्या ह्या मोत्यांना व दागिन्यांना उत्तरकुरूंचें वळण होतें, तें बदलून मत्स्यदेशाच्या ह्या खऱ्या रत्नाला साजेसा त्यांना घाट देण्यांत माझे इतके दिवस गेले. मजकडून उशीर झाला, ह्या माझ्या अपराधाबद्दल हे दागिने

व हा गजरा माझ्या हातांनीं तुझ्या अंगावर घालण्याचा दंड मला कर. (तिजपुढें गुडघे टेंकून) आराध्यदेवतेची ह्या गजऱ्यानें व दागिन्यांनीं पूजा करण्याचा अधिकार ह्या भक्ताला आहेच.

रत्न०—(उठून दूर उभी रहाते.) मला हे दागिने नकोत आणि कांहीं नको.—वरपांगीं बोलणीं मला समजतात हो.—मेलं पर्वा सर्वांच्या देखत लाजबीज गुंडाळून ठेवून मी डोळ्यांपुढें उभी असतांना, त्या सैरंध्रीकरतां इतका अट्टाहास करायचें झालें, आणि आतां माझी ही अशी स्तुति ! एखाद्या नवऱ्यानें जर इकडचें हें भाषण ऐकलें तर त्याला वाटेल, एकपत्नीपणाचें व्रत अयोध्येचा रामराजा इकडूनच शिकला.

कचि०—मला वाटलेंच तूं अशी रागावणार,—रुसणार,—म्हणून उशीरा कां होईना पण दागिन्यांचा पक्का बंदोबस्त करून आलों.—हा पहा पायांत घालायचा नवा दागिना आहे. मत्स्यदेशच्या बायकांनीं हा पूर्वी कधीं पाहिलाहि नसेल. राजसूय यज्ञाचे वेळीं कालयवनांना जिंकण्याकरितां म्लेंछ देशांत अर्जुन ज्या वेळीं गेला, त्या वेळीं यवनराजानें दिलेल्या करभारांत हा जडावाचा दागिना होता. परराष्ट्रांतून आणलेले जवाहीर व दागिने धर्मराजानें ब्राह्मणांकडून लुटविले, पण हा दागिना फारच मोहक व अपूर्व घाटाचा असल्यामुळें द्रौपदीनें तो आपल्याकरितां ठेवून घेतला. पहा तर खरा. (दागिना पुढें करतो.)

रत्न०—(दागिना हातांत घेऊन) इश्श मेलं, नाटकशाळेंतल्या कलावंतिणीच्या पायांत असतात, तसे घुंगुर ह्याला लावले आहेत; प्रतिष्ठित बायका का असला दागिना पायांत घालतात !

कचि०—वा ! कालयवनांच्या सर्व राजस्त्रिया हा दागिना पायांत घालतात. द्रौपदीचा तर हा आवडता दागिना.—ह्याला कौरवमंडळांत तोरड्या म्हणतात; आणि आजकाल सर्व हस्तिनापुरच्या बायका हा दागिना हौसेनें घालतात !

रत्न०—असतील घालीत ! लहान मुलीबाळींनीं पायांत घातला तर चालेल; पण मोठ्या बायकांना नाहीं बाई चांगला शोभायचा.

कीच०—बाहेर देवदर्शनाला जातांना पोक्तपणाचें प्रदर्शन करण्याचे वेळीं पाहिजे तर हा घालूं नये. पण रात्रीची रंगमहालांतली ही वेळ म्हणजे अल्लडपणाचीच असते नाहीं !

रत्न०—काय नसते अल्लडपणाची.–माझी एक विनंति आहे. त्या विनंतीप्रमाणें ऐकायचें असलें तर मी हा दागिना घालतें, नाहीं तर कांहीं एक नको मला !

कीच०—( स्वगत ) बायकांनीं हातांत दागिना घेतला, कीं त्यांचा तोरा मऊ पडलाच !

रत्न०—माझी विनंती ऐकायची नाहीं वाटतें मनांत ! एवढा कसला त्याबद्दल विचार !

कीच०—एक कां ! शंभर विनंत्या आम्ही ऐकूं; पण केव्हां ?

रत्न०—केव्हां ?

कीच०—ह्या तोरड्या मी माझ्या हातानें तुझ्या पायांत येथें घालतों, मग तेथें नीट बसून ह्या दागिन्यांनीं आराध्यदेवतेची ह्या भक्तानें पूजा केल्यावर.

रत्न०—मग माझी विनंति ऐकली पाहिजे.

कीच०—कबूल ( पायांत तोरड्या घालतो. ) आतां पलंगावर बसायचें होतें. ( पलंगापर्यंत हात धरून चालत नेत असतांना )—आम्हाला तोरड्या घालून चालून दाखवायचें होतें, म्हणून रुसल्याचें मीष करून अशी दूर येऊन उभी राहिली होतीस होयना ? होय असेंच.–हलके चालायचें राणीसाहेब.–सौंदर्याचे गर्वांत ताठ्यानें पडलेलें तुझें प्रत्येक पाऊल माझ्या मानापमानाच्या कल्पना पायांखालीं ठेंचण्याकरितां तूं टाकीत आहेस, असें मला वाटतें.

रत्न०—पुरे झाली मेली थट्टा ! ( पलंगावर बसतात. )

कीच०—आतां अगोदर हीं हिऱ्याचीं कंकणें हातांत घालूं, का हा मोत्याचा हार गळ्यांत घालूं, का प्रथम ही नथ नाकांत अडकावूं ?

रत्न०—आतां इतकी मेहनत नको करायला हो, मी माझ्या हातानेंच हे दागिने अंगावर घालतें, मग तर झालें ?

कीच०—छे ! छे ! देवता प्रसन्न होऊन जरी बोलूं लागली, तरी पूजा ही भक्तानेंच केली पाहिजे. तुझ्या कोमल हातांना जर काम पडलें तर मी भक्त कसचा ?

रत्न०—माझी विनंति ऐकेन म्हणून दिलेल्या वचनाची आठवण आहेना?

कीच०—हो आहे तर.—काट्यांच्या पाशांत पाय अडकलेला मत्त गजेंद्र जसा अगदीं मऊ येतो, त्याप्रमाणें ह्या सांखळ्यांच्या व तोरड्यांच्या बिड्या मुसमुसणाऱ्या तरुणींच्या पायांत पडल्या, म्हणजे त्यांचें फुणफुणणें पार नाहींसें होतें.—माझें हें बोलणें खोटें करण्याकरितां लागलेंच रुसायला नको.—तुझी विनंति ऐकून घेईन.—एवढी नथ घालूं द्या. (नथ घालतो) वेसणीचा बैल आहाराच्या बाहेर जाण्याची जशी भीति नाहीं, त्याप्रमाणें नाकांत नथ अडकवणाऱ्या नवऱ्याचे मर्जीबाहेर कोणतीहि तरुणी जाणें शक्य नाहीं.

रत्न०—अशा बोलण्यानें मी कांहीं फसावयाची नाहीं. माझी विनंति ऐकली पाहिजेहो.

कीच०—अलबत.—माझ्या सांखळ्या तोरड्यांच्या बिड्या तुझ्या पायांत आहेत,—नवीन आणलेल्या नथीची वेसण तुझ्या नाकांत आहे.—ह्या वेळीं मला न आवडणारा एक शब्दहि रत्नप्रभेच्या तोंडांतून निघणें शक्य नाहीं, ह्याबद्दल मी पाहिजे ती पैज मारतों.—आतां मला कसली भीति!—सरकार, मर्जीस येईल तो हुकूम फर्माविण्याची मेहेरबानी व्हावी, बंदा सेवेला तयार आहे.

रत्न०—विनंति इतकीच आहे, त्या सैरंध्रीचा नाद सोडावा.

कीच०—कां?—सैरंध्रीला मी नाटकशाळेंत आणली, तर तुझें काय त्यांत नुकसान झालें?—इतक्या आणखी नाटकशाळेंत पडल्या आहेत, त्यांत ती पडून राहील.

रत्न०—नाहीं, सैरंध्रीचा नाद सोडल्याचें वचन आपल्यापासून घेतल्याशिवाय मी राहणार नाहीं.—दिलेंच पाहिजे वचन.

कीच—रत्नप्रभे, इतकीं वर्षे माझा स्वभाव तुला माहीत असून, सैरंध्रीचा तुझ्यासारख्या निरुपम अप्सरेला मत्सर वाटावा, हें आश्चर्य आहे!

रत्न०—मी मत्सरबुद्धीनें आपणांस ही विनंति करीत नाहीं.—आपल्या नाटकशाळेंत राहण्यास जर सैरंध्री मनापासून कबूल नाहीं, तर तिच्यावर जुलूम करण्यांत आपणासारख्या वीरांना काय पुरुषार्थ आहे? आज चार पांच दिवस ती एकसारखी रडत असते म्हणे!—महाराज, पुरुष जुलूम करूं लागले म्हणजे

पतिव्रतेचें मन कसें दुःखानें होरपळून जातें, ह्याची कल्पना पुरुषांना कधींहि करतां यावयाची नाहीं; बायकांच्याच जन्माला जावें, तेव्हां त्यांच्या तसल्या दुःखाची कल्पना करतां येईल.—महाराज, माझें मन आपणावरचें कधींहि ढळावयाचें नाहीं, हें आपणांस पक्कें माहीत आहे, तेव्हां सैरंध्रीच्या आजच्या स्थितींत मी आहें असें मनांत आणा, म्हणजे आपल्याला व मला असल्या अपमानानें किती दुःख होईल हें आपल्या ध्यानांत येईल.—माझी इतकीच विनंति आहे कीं, दुसऱ्याच्या बायकोवर जुलूम करणें हें आपण आजपर्यंत मिळविलेल्या नांवालौकिकास काळिमा आणणारें आहे.

कीच०—रत्नप्रभे, तुझें म्हणणें बरोबर आहे; पण तूं एक गोष्ट विसरते आहेस. आम्ही राज्यकर्ते आहोंत, आणि सैरंध्री आमच्या ताटाखालचें मांजर आहे. तेव्हां जो न्याय तुला लागू, तो सैरंध्रीला लागू करतां कामा नये.—राज्यकर्ते ते राज्यकर्ते, आणि दास ते दास; हा भेद नेहमीं लक्षांत ठेविला पाहिजे.

रत्न०—पण महाराज, कोणचीहि स्त्री राज्यकर्त्यांपैकीं नाहीं, एवढ्याचमुळें पातिव्रत्य झुगारून देण्यास तयार होईल असें आपणांला वाटतें तरी कसें ?

कीच०—तसें कां वाटूं नये ? तसें नसतें तर कीचक व अनुकीचक यांच्या नाटकशाळा एवढया टोलेजंग कधींहि झाल्या नसत्या !

रत्न०—तें कसेंहि असो, आपलें हें करणें मला कांहीं पसंत नाहीं.—माझ्या शब्दाला आपण नेहमीं मान देत असतां, म्हणून विनंति करतें; चौदा चौकड्यांचा राजा रावण, त्यानें जंगलांत संचार करणाऱ्या एका क्षुल्लक मानवाची स्त्री सीता आहे असें समजून तिच्यावर जुलूम करण्याचा प्रयत्न केला; त्याचा परिणाम काय झाला, हें लक्षांत आणा, आणि सैरंध्रीचा नाद सोडून द्या.

कीच०—रत्नप्रभे, फुकट—फुकट—इतकीं वर्षें माझ्या सहवासाला राहिलीस !—तुला मी प्रथमच बजावलें आहे, सैरंध्रीला मीं माझ्या नाटकशाळेंत आणली तर तुला मत्सर वाटावयाचें कारण नाहीं.—तुझ्यावरचें माझें प्रेम केंसभरहि कमी करण्याचें सामर्थ्य सर्व विश्वांतील कोणच्याहि तरुणीच्या आंगीं नाहीं.—सैरंध्री बरी दिसली, सहज मीं तिला मागितली ! पण मला ती मिळत नाहीं असें दिसल्यावर कोणच्याहि कारणाकरितां गप्प बसणारा मात्र हा कीचक



**कीचक**—राज्यकर्ते ते राज्यकर्ते, आणि दास ते दास; हा भेद नेहमीं लक्षांत ठेविला पाहिजे.

[पृ. ४६

नव्हे.—माझ्या मागणीबरोबर जर सुदेष्णेनें सैरंध्रीला मजकडे पाठविलें असतें,—माझा हुकूम न मानण्याचें धाडस जर सैरंध्रीनें केलें नसतें,—तर रत्नप्रभे, तुझ्या आतांच्या शब्दाला मान देऊन सैरंध्रीच्या शरिराला हातहि न लावतां मी तुझ्याकरतां तिला तिच्या नवऱ्याचे घरीं सन्मानानें पोंचती केली असती. पण——

रत्न०——पण काय, ह्यांत कसला अपमान आहे?—असें करण्यानें आपली कीर्ति दिगंतरीं पसरेल; व साधुसंत आपल्या ह्या सत्कर्माचे पोवाडे स्वर्गांतहि गाऊं लागतील.

कीच०——छत्! भलती वेडगळ कल्पना!—स्वर्गांतल्या कीर्तीहून आम्हां सत्ताधाऱ्यांना आमची इहलोकची इभ्रत जास्त किंमतीची वाटते.—आमचा शब्द केव्हांहि खालीं पडतां कामा नये.—यःकश्चित् दासी जर माझा हुकूम तोडूं लागल्या, तर त्या नेभळ्या कीचकाची ही बायको म्हणून रस्त्यांत तुझ्याकडे लोक बोटें दाखवितील, ह्याचा नको का मला विचार कराबला!—बस्स झाला तो हुकूम होऊन गेला, आतां काय त्याचें! घटके घटकेला जो वीर आपले हुकूम मागें घेत असतो, त्याची बायको होण्यांत जर रत्नप्रभेला भूषण वाटत असेल, तर माझ्याबरोबर माझ्या अर्ध्या सिंहासनावर बसण्याची तुझ्या अंगीं लायकीच नाहीं असें मी समजतों.—ही सैरंध्री एखाद्या दासाची बायको आहे, तशी जरी नसली, आणि एखाद्या प्रख्यात रथी, महारथी, अतिरथी ह्यांची बायको असली, इतकेंच नव्हे तर एखाद्या प्रमुख अनुकीचकाची जरी ती अर्धांगी असली, तरी मीं दिलेली मुदत संपण्याबरोबर तिनें माझ्या नाटकशाळेंत आलेंच पाहिजे.—फिरीव, खुशाल तोंड फिरीव.—माझा शब्द मी खरा करणार, मग मी रत्नप्रभेच्या प्रेमास मुकलों तरी बेहेत्तर! (पडदा)

## अंक दुसरा समाप्त

# अंक तिसरा.



## प्रवेश पहिला.

**स्थळ**—राजवाड्यांतील पटांगण; मैत्रेय, सौदामिनी, व कीचकाच्या दोन दासी प्रवेश करितात.

**मैत्रे०**—ए पोरीनो, तुम्ही कोणीकडे गेला होता! तुमचे यजमान आहेत तरी कोठें? कीं चौऱ्या हातांत घेऊन उगीच इकडून तिकडे ह्या पटांगणांतून हिंडता?

**प० दा०**—कीचकमहाराजांची स्वारी आतां इतक्यांत इकडे येईल म्हणून आम्ही येथें आलों.

**दु० दा०**—धाकट्या बाईसाहेबांना बृहन्नडा गाण्याची तालीम कशी देते तें पहाण्याकरितां महाराजांनीं आम्हांला इकडे आणलें आहे.

**मैत्रे०**—या, तुम्हांला एखादी चीजबीज येते कीं नाहीं?

**सौदा०**—गायला यावयाला गळा बिळा बरा असावा लागतो. तुमची आवाजी बरी आहे काय?

**मैत्रे०**—गायला यावयाला गळा कशाला चांगला हावा? अग बृहन्नडा येथें येऊन महाराजांनीं मला आपला मैत्रेय करण्यापूर्वी संगीत वर्गावर माझीच नेमणूक होती; त्या वेळीं जेव्हां मी गाण्याच्या तालमी घेत होतों, तेव्हां गाणारणीला कोकिलेसारखा गोड आवाज असला पाहिजे, असा निर्बंध ठेवलाच नव्हता. गायला बसल्यावर आवाज गोड नसला तर गर्धभसुरांत गायलें म्हणून संगीताची कोठें आडकाठी आहे!

**प० दा०**—विराट महाराजांचा संगीत वर्ग आपल्याकडे होता तेव्हां आम्ही आलों असतों तर बरें झालें असतें.

**दु० दा०**—अजूनहि आम्हांला एखादे वेळेला तालीम दिली तर आम्ही शिकायला येऊं.

**मैत्रे०**—तुमचा आवाज फुटलेला असला तरी माझ्या संगीतांत चालेल. तुमचे पाय मात्र शाबूत पाहिजेत. कारण पायाच्या धांवत्या ठेक्यावर माझें संगीत गाऊन दाखवावयाचें असतें. माझ्या धांवत्या गाण्याची तालीम लंगड्याला देतांच यावयाची नाहीं.

**प० दा०**—आमचे पाय शाबूत आहेत.

**दु० दा०**—आम्ही एक दोन योजनें सहज धांवत जातों.

**मैत्रे०**—तर मग दुडदुड पळणाऱ्या संगीताप्रमाणें धांवून दाखवा पाहूं. (दासी धांवत जातात.) सौदामिनी, तुझ्यापेक्षां नव्या दासी फारच चलाख दिसतात. तुला इतक्या दिवस शिकविलें पण पालथ्या घागरीवर पाणी !

**सौदा०**—मेलं पुरुषांच्या पाशीं गायला शिकायची मला लाजच वाटते; मी आतां बृहन्नडेपाशीं शिकणार आहें. बाकी आपल्यासारख्या म्हाताऱ्यापाशीं शिकायला कांहीं हरकत नाहीं.

**मैत्रे०**—ही बृहन्नडा आली म्हणून बरें झालें, नाहीं तर मला अगदीं म्हातारपणाचा कंटाळा येण्याची वेळ आली होती. कोणाच्या मुलीला शिकावयाचें असलें म्हणजे बोलाव संगीतशाळेंतल्या ह्या म्हाताऱ्या पंतोजीला,—जणूं काय हा म्हातारा पुरुषच नव्हे !

**सौदा०**—ही बृहन्नडा आमच्या शहरांत आल्यानें आमच्या मुलींचें मोठें नुकसानच झालें म्हणावयाचें ?

**मैत्रे०**—हं हें कसें काय ?

**सौदा०**—आपल्यासारख्या वृद्ध व पोक्त गुरूच्या शिक्षणाला त्या मुकल्या !

**मैत्रे०**—कां आज फारच स्तुति चालली आहे ? कांहीं कामगीम आहे वाटतें !

**सौदा०**—कांहीं नाहीं;—पण थोडेसें—काम—म्हणून इतकेंच—आपली व कंकभटाची मैत्री आहे, आणि कंकभटाच्या नादीं सैरंध्री असावी—मला आपला संशय येतो हो.

**मैत्रे०**—आहे कंकभटाला सैरंध्रीचा नाद आहे; मग पुढें ?

**सौदा०**—सैरंध्रीचें मन वळवून कीचकमहाराजांच्या राजवाड्यांत ती जाईल असें करण्याविषयीं बाईसाहेबांची मला आज्ञा झाली आहे. तेव्हां ह्मटलें आपण जर कंकभटाकडून सैरंध्रीचें मन वळविलें तर—

**मैत्रे०**—अग कंकभट म्हणजे गरीब सोज्वल ब्राह्मण, द्यूत खेळण्याचा त्याला जरा नाद आहे इतकेंच; बाकी—अरे वा! विराट महाराज आणि महाराणीसाहेब इकडेच येत आहेत. (विराट आणि सुदेष्णा प्रवेश करितात)

**विरा०**—ह्या क्षुल्लक बाबीला कीचकमहाराज एवढें महत्त्व देतात, ह्याचेंच मला आश्चर्य वाटतें!—एखाद्या दासीला कोणाच्याहि नाटकशाळेंत राहूं नये असें वाटत असलें तर त्याबद्दल तिची तारीफच केली पाहिजे. कीचकमहाराज तुझे भाऊ आहेत, शिवाय माझ्या राज्याचे मुख्य आधारस्तंभ कीचक व अनुकीचक हेच होत, तेव्हां कीचक मला प्राणाहूनहि अधिक प्रिय आहे, हें सांगावयास नको. पण असल्या क्षुल्लक बाबींत इतका अरेरावीपणा काय कामाचा?

**सुदे०**—ही क्षुल्लक बाब कसली?—चार दिवसांची मुदत कीचक महाराजांनीं दिली होती तीहि आज टळून गेली; आतां पुढें काय होईल ह्याची मला भीति वाटते हो.—बायकांच्या पायीं रणें माजतात गडे. माझ्याच स्वयंवराचे वेळेला लढाई करून इकडून किती राजपुत्रांना जिंकणें झालें, आठवण आहे काय?

**विरा०**—राजकन्येकरतां युद्ध होईल, कबूल आहे; पण एखाद्या दासीकरितां लढाई! हं शक्यच नाहीं.—आम्ही सत्ताधारी राजे लोक अद्याप इतके उल्लू झालों नाहीं.

**सुदे०**— इकडच्या प्रमाणें कीचक शांत स्वभावाचा असता,—उतावीळ व संतापी नसता—तर क्षुल्लक गोष्टीवरून तंटाबखेडा व्हावयाचा नाहीं. पण कीचकमहाराज किती हट्टी आहेत हें आपणास माहितच—

**विरा०**—कीचक महाराज हट्टी आहेत खरें; पण कायरे मैत्रेया, ह्या सैरंध्रीचा तरी इतका हट्ट कां असावा?

**मैत्रे०**—माझें देखील असेंच म्हणणें. कीचकमहाराज जर आपण होऊन प्रसन्न झाले आहेत तर हिनें तरी हट्ट कां करावा ?—बाकी ही जर पूर्वीच्या-प्रमाणें आज इंद्रप्रस्थास द्रौपदी महाराणीपाशीं असती तर तिनें इतका हट्ट केला नसता ?

**विरा०**—तें कसें ?

**मैत्रे०**—मालकीणीला जर प्रत्यक्ष पांच नवरे, तर एकपतिव्रताचा बाणा इंद्रप्रस्थास दासींच्या अंगीं कोठला दिसावयाला !

**सुदे०**—कायग सौदामिनी, सैरंध्रीला नीट समजावून सांगितलेंस का ?

**सौदा०**—सैरंध्री पलीकडे वसंतबागेंत फुलें तोडावयाला गेली आहे आणि कंकभटजीहि तिकडेच गेले आहेत, म्हणून मैत्रेय भटजींना बरोबर घेऊन मी सैरंध्रीकडे चाललें होतें; इतक्यांत सरकारची स्वारी आली.

**विरा०**—आम्ही वसंतबागेकडेसच चाललों आहों. सैरंध्रीला आमच्याकडे पाठवून दे, म्हणजे आम्ही स्वतः ह्या प्रकरणाची चौकशी करून सैरंध्रीला तिच्या हिताच्या दोन गोष्टी समजावून देऊं. [विराट व सुदेष्णा जातात]

**मैत्रे०**—खरेंच, सौदामिनी, तूं जर सैरंध्रीच्या जागीं असतीस तर आज तुझा केवढा बडेजाव झाला असता ! विराट महाराजांनीं तुझीं आर्जवें केलीं असतीं ! सुदेष्णा महाराणीसाहेबांनीं तुझ्याकरतां कुंटिणीचें काम पतकरलें असतें !

**सौदा०**—खरेंच मैत्रेय भटजी, सैरंध्रीच्या आणि माझ्या रूपांत काय एवढा फरक आहे ?—माझी आपली समजूत आहे, आज नाहीं उद्यां कीचक-महाराजांचें मन माझ्यावर बसल्यावांचून राहणार नाहीं.—भटजीमहाराज, खरें खरें सांगायचें मी सैरंध्रीहून वाईट दिसतें काय ?

**मैत्रे०**—चेहरा असा नीट मजकडे कर, नीट न्याहाळून पाहूं दे.—भाल-प्रदेश विस्तीर्ण नाहीं; केंस उर्मटपणानें पुढें आले आहेत, त्यांना मागें पिटाळून लाविलें पाहिजे.—नाक फेंदाडें आणि फाजील मोठें आहे; तासून तासून बारीक कळीदार केलें पाहिजे.—डोळे बारीक आहेत; सभोंवारचीं हाडकें व मांस जरा खणून काढून डोळ्याचा तलाव गरगरीत मोठा केला पाहिजे.—आणि हीं सगळी भर बसलेल्या गालफडांत टाकली म्हणजे तूं हुबेहूब सैरंध्री !

[ कीचक व दोन दासी प्रवेश करितात. ]

**कीच०**—कोठें आहे सैरंध्री ? मैत्रेया, कोठें आहे सैरंध्री ?

**मैत्रे०**—उद्यांपरवांची सैरंध्री ही येथें उभी आहे, आजकालची सैरंध्री—

**कीच०**—मैत्रेया, कोणाची आणि केव्हां थट्टा करावी, हें तुला म्हातारपणींहि समजूं नये ?

**मैत्रे०**—साठी बुद्धि नाठी.—ह्या दासीची जशी थट्टा करतों तशीच सरकारची करायला गेलों—माफी असावी.

**कीच**—कायग पोरींनों, सैरंध्रीला हुडकून काढायला सांगितलें आणि तुम्हांला कांहीं पत्ता लागला नाहीं ना ?

**प० दा०**—नृत्यशाळेंत मीं तिला पाहिली.

**दु० दा०**—चित्रशाळेंत मीं तिला हुडकली.

**प० दा०**—संगीतशाळेंत मीं तिचा शोध केला.

**दु० दा०**—पाकशाळेंत मीं तिची चौकशी केली.

**मैत्रे०**—राजवाड्यांतल्या कोणत्याच शाळेंत ती नाहीं ! बाहेरच्या बृहन्नडेच्या शाळेंत शोध केलात का ?—सरकार, ह्या पोरींच्याकडून सैरंध्रीचा पत्ता लागायचा नाहीं. शिकारी कुत्रे दृष्टीस पडले म्हणजे पारधी मागोमाग येत आहे असें समजून भ्यालेले ससे तेव्हांच दडून बसतात.

**कीच०**—मैत्रेया, ह्या वेळीं अमक्याच ठिकाणीं सैरंध्री आहे अशी नक्की बातमी सांगितलीस तर तुला मोठें इनाम मिळेल.

**सौदा०**—ह्या वेळेला सैरंध्री वसंतबागेंत फुलें तोडीत आहे.

**कीच०**—हें घे तुला इनाम. ( मोत्यांचा कंठा देतो )

**मैत्रे०**—वसंतजंगलांत सैरंध्री पूर्वेकडच्या झुडपांत आहे, का पश्चिमेकडच्या रानांत हिंडत आहे, वा दक्षिण डबक्यांतील हंसाना खेळवीत आहे, का उत्तरेकडच्या डबक्यांतील कमळें तोडीत आहे, का मध्यावरच्या झोंपडीच्या महालांत हार गुंफीत बसली आहे,—नक्की बातमी सांगण्यापूर्वीच इनाम देऊन सरकार पार झाले ! सैरंध्रीकरतां सरकार इतके आशाळभूत झाले असतील असें मला नव्हतें वाटलें.

कीच०—चला आतां वसंतबागेंत. आतां मात्र तुम्ही पत्ता बरोबर काढिला पाहिजे. [ कीचक व दासी जातात. ]

मैत्रे०—सैरंध्रीचा तूं पत्ता सांगितलास एवढ्यावरून तुला हा मोत्यांचा कंठा बक्षिस मिळाला; आणि जर का सैरंध्रीला कीचकमहाराजांच्या नाटकशाळेंत नेऊन घालशील, तर कीचकमहाराज तुझ्यावर इतके प्रसन्न होतील कीं सैरंध्रीच्या ऐवजीं तुलाच अन्तःपुरांत ठेवून घेतील.

सौदा०—एकीमागून दुसरी, दुसरीमागून तिसरी, असेंच पुरुषांना बायका घेरीत असतात. [ रत्नप्रभा व मंदहासिनी प्रवेश करितात. ]

मैत्रे०—रत्नप्रभा राणीसाहेब आल्या; ह्या कीचकमहाराजांचा शोध करीत असतील. महाराजांचा पत्ता सांगून मी बक्षिस मिळवणार. तूं मध्यें तोंड घालशील तर खबरदार, अशी तोंडाला मुसकट घातल्यासारखी उभी रहा.

( तोंडावर हात ठेवून उभी करतो. )

रत्न०—मला नाहीं वाटत सैरंध्री मनाची इतकी खंबीर असेल—स्वारीनें आपण होऊन एकांतीं गांठून तिचीं आर्जवें केलीं तर तिचा निश्चय टिकेल, असें होणेंच नाहीं.—तिकडचे डोळे असे कांहीं जादुगिरी आहेत कीं मोहिनी अस्त्राचा वर्षाव त्या नेत्रांतून होतो आहेसा वाटतो !

मंद०—बाईसाहेब, सैरंध्री फारच निराळ्या प्रकारची बायको आहे. एखाद्या तपस्व्यालाहि लाजिवणारी तिची वर्तणूक येथें सर्वांना माहीत आहे.

रत्न०—सगळें खरें, पण कौरवांच्या दरबारांत वागली आहे ना ! ह्याचेंच मला भय वाटतें.—अग ह्या कौरवांच्या पूर्वजानें देवयानीशीं लग्न केलें, आणि देवयानीची सैरंध्री राक्षसकन्या शर्मिष्ठा हिच्यापासूनच पुढें कौरवांचें कुळ उत्पन्न झालें. ह्या कुळांतल्या सैरंध्रींना संवयच असली पाहिजे, मालकाचें मन केव्हां मुठींत घेईन आणि यजमानणीला घराबाहेर केव्हां घालवीन.

मंद०—पण सैरंध्रीचा अनुभव बाईसाहेबांना निराळाच येईल.

रत्न०—द्रौपदी राणीसाहेबांच्या स्वयंवरापासून ही त्यांच्यापाशीं होती, आणि तितक्या वेळांत पांडवांनीं द्रौपदीकडे दुर्लक्ष केलें नाहीं; एवढ्यावरून

ही चांगल्या वर्तणुकीची असावी.—कायग ए सौदामिनी, अशी दांतखिळी बसल्यासारखी कां उभी आहेस ?

**मंद०**—खरेंच बाईसाहेब, हिची दातखिळीच बसली असली पाहिजे; नाहीं तर हिच्या तोंडाची टकळी—जिभेचा पट्टा—सारखा सुरू असावयाचा !

**मैत्रे०**—खबरदार, तूं अगोदर बातमी सांगशील तर.—महाराणीसाहेब, मला कोणचें बक्षीस देणार हें अगोदर समजलें पाहिजे, नाहीं तर हिच्याप्रमाणें माझीहि मुस्कटदाबी होईल !

**रत्न०**—पण बक्षीस कशासाठीं ?

**मैत्रे०**—कशासाठीं ? मी लहान सहान बक्षिस साफ घेणार नाहीं.—सैरंध्रीचा पत्ता सांगितला म्हणून कीचकमहाराजांनी हिला मोत्यांचा कंटा बक्षिस दिला. आपणाकडून मला ह्याहून मोठें बक्षिस मिळालें पाहिजे.—बायका पुरुषांइतक्या कंजूष नसतात; कारण पुरुषांना श्रम करून मिळवावें लागतें आणि बायकांना फुकटचे दागिने मिळतात.—तेव्हां मला किती कंटे बक्षिस मिळणार हें अगोदर समजल्याशिवाय, वसंतबागेंत सैरंध्रीचा पत्ता काढीत कीचकमहाराज कसे भटकत आहेत, ह्यासंबंधाचा एक ब्रहि माझ्या तोंडून निघणार नाहीं. [ तोंड दाबून उभा राहतो. ]

**रत्न०**—मंदहासिनी, वसंतबागेकडे मला घेऊन चल. सैरंध्रीचा उगीच छळ स्वारी करीत असेल; मला वेळेवर तेथें हजर झालेंच पाहिजे.

**मंद०**—ह्या इकडून असें यावें बाईसाहेब. ( मंदहासिनी व रत्नप्रभा जातात ) ( मैत्रेय व सौदामिनी, तोंडावर हात ठेवून तोंड दाबून व खुणा करीत उभीं राहतात. )

**मैत्रे०**—मला बक्षिस मिळेपर्यंत मी मुस्कट दाबून धरणार.

**सौदा०**—बोलायाला हरकत नाहीं, असा आपला हुकूम होईतों मी मुस्कट दाबून धरणार.

**मैत्रे०**—मुक्यासारखें किती वेळ उभें राहावयाचें ?

**सौदा०**—रत्नप्रभा राणीसाहेबांनीं आपणाला फसविलें त्याला मी काय करूं ?

**मैत्रे०**—बायका धूर्त असतात; तुला तेवढा कंठा; आम्ही पुरुष साधे भोळे!

**सौदा०**—बरे असतील साधे भोळे, अतिशहाणे मात्र असतात.

**मैत्रे०**—अतिशहाणा म्हणून हा बैल रिकामा!—आतां मला बक्षिस कसें मिळेल ह्याची एखादी युक्ति तूंच सांग.

**सौदा०**—कंकभटामार्फत सैरंध्रीचें मन वळवा.

**मैत्रे०**—बरें तर, आतां काढ तोंडावरचा हात.—चल आपण वसंतबागेंत जाऊन कंकभटाला गाठूं. दाखीव मला वसंतबागेचा रस्ता दाखीव.

**सौदा०**—ह्या इकडून असें यावें भटजी महाराज.

**मैत्रे०**—वेत्रधारीसारखी ओरड माझ्यापुढें.

**सौदा०**—आस्ते कदम भटजी महाराज. ठेंच लागेल आस्ते कदम.—हा येथें फत्तर आहे, त्यावर हापटून दांत पडतील.

**मैत्रे०**—माझे पूर्वीच दांत पडले आहेत. हे नकली आहेत!—वेत्रधारी-सारखी ओरड माझ्यापुढें.

**सौदा०**—आस्ते कदम—असे या रस्त्यानें यावें महाराज, आस्ते कदम.

(जातात)

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—वसंतबाग. **कंकभट**, व **बल्लभ** शिळेवर बसले आहेत; **सैरंध्री** उभी आहे.

**सैरं०**—महाराज, माझ्या जन्मकाळचे ग्रहच असे कांहीं विचित्र पडले आहेत कीं, कोणचीच गोष्ट सरळ होत नाहीं. स्वयंवराचा समारंभ ठरला तर बाबांनीं पणच विचित्र लाविला; आणि सर्व क्षत्रियांना खालीं मान घालण्याची वेळ येऊन द्रौपदी आजन्म अविवाहित राहते कीं काय अशी दादाला भीति पडली. त्या वेळीं तो सारथीपुत्र कर्ण मत्स्यभेद करतो कीं काय अशी मला भीति वाटून मी हलकट कुलांत जन्मलेल्याशीं लग्न करणार नाहीं असें साफ सांगितलें. तेव्हां तो मानी कर्ण मनांतल्या मनांत विरघळून जाग्यावरून उठ-

लाच नाहीं.—आमच्या देशांतील त्या सारथीपुत्राच्या त्रासांतून त्या वेळीं मी तशी सुटलें. पण हा मेला कीचक—मत्स्य देशाचा हा सारथीपुत्र-ह्याच्या त्रासांतून सुटण्याचा मार्गच मला दिसत नाहीं.—ह्याची बायको रत्नप्रभा महा-साध्वी, तिनें त्याची चांगली कानउघाडणी केली; मी त्याला चांडाळ, राक्षस, लांडगा म्हणून पाहिजे तशा शिव्या दिल्या; सुदेष्णा महाराणीसाहेबांनीं चार गोष्टी समजून सांगितल्या; पण कांहीं उपयोग नाहीं. म्हणून एक त्याला तरी जगांतून नाहींसा केला पाहिजे, नाहीं तर मी तरी नाहींशी झाली पाहिजे; एरव्ही हा तंटा मिटणार नाहीं.

कंक०—हे दोनहि मार्ग मला पसंत नाहींत. कीचकाला जगांतून नाहींसा करा, हें म्हणणें सोपें आहे, पण कृति फार कठीण आहे.

बल्ल०—ह्यांत कसलें कठीण आहे?—दादा, आपली आज्ञा होऊं द्या,—जरासंधाला जसा मी मारला, बकासुराला बगलेंत मारून त्याचा नैवेद्य खाऊन त्याला यमपुरीची जशी वाट दाखविली, काम्यक वनामध्यें किर्मीर राक्षसाला ज्याप्रमाणें एका क्षणांत होता कीं नव्हता केला, त्याप्रमाणें आपली आज्ञा होण्याचा अवकाश,—सांगाल त्या ठिकाणीं, सांगाल त्या वेळीं व सांगाल त्या प्रकारानें,—कीचकाच्या शरीराचे हजारों तुकडे करून प्रत्येक अनुकीचकाच्या मंदिरांत एक एक भाग टाकून सर्व अनुकीचकांना आमच्या भीतीनें कांपा-वयास लावीन.

सैरं०—असें झालें, तरच आजच्यासारखे प्रसंग वारंवार येण्याचें बंद होईल.

कंक०—उगीच संतापून जाऊन एका संकटांत दुसऱ्या संकटाची भर घालण्यांत काय हांशिल आहे?—भीमा, तुझी शक्ति अमर्याद असून प्रत्येक अनुकीचक जरी कीचकाप्रमाणें उन्मत्त झाला तरी सर्वांचा मद उतरण्याचें सामर्थ्य तुझ्या अंगीं आहे, पण—

सैरं०—पण काय? जेव्हां तेव्हां असें करून हा वनवास आणि अज्ञात-वास सर्वांच्या मागें लाविला.—शत्रूंना जर जेथल्या तेथें ठेंचीत आला असतां

तर असल्या हलकट सारथीपुत्रानें डोळे उघडून मजकडे पहाण्याची काय प्राज्ञा होती? जे सांगून सवरून शत्रू, त्यांच्याशीं कशाला इतकें नीतीनें आणि दयेनें वागायला पाहिजे? महाराज, सापाशीं जर आम्ही दयेनें वागलों आणि त्याची गय केली तर पुढें त्या सापाच्या दंशानें मरणारांची हत्त्या आपल्या माथीं बसणार नाहीं काय? ह्या भावी हत्त्येचें पातक चुकविण्याकरितां आज निष्ठुर व निर्दय होणें, हाच सत्य मार्ग आहे असें मला वाटतें.

कंक०—न्यायबुद्धीला केव्हां केव्हां बाहेरून निर्दयतेचें सोंग आणावें लागतें, हें खरें; पण द्रौपदी, असला निष्ठुरपणा जर केवळ स्वहिताकरितांच असेल तर कितीहि शांतपणानें, सावकाशीनें, पक्का विचार करून व अंतःकरण दयाळू ठेवून, हा निष्ठुरपणा दाखविला असला, तरी परमेश्वर त्यावर पापाचाच छाप मारल्यावांचून राहणार नाहीं. स्वतःच्या भावी सुखाच्या लालुचीनें आज क्रूर होणें म्हणजे लोभाच्या जाळ्यांत सांपडून फसण्यासारखें आहे. ज्याला आज दुःख द्यायचें त्याचें त्या दुःखापासून अधिक कल्याण होणार आहे, अशी दयाळू न्यायदेवतेची पूर्ण श्रद्धा असल्याशिवाय क्रूरपणाचें प्रत्येक कृत्य पापमय आहे असें समजावें.

सैरं०—मग शत्रूचें शासन केव्हांच करूं नये एकूण?–महाराज, आपण क्षत्रिय कुलांत कसे जन्मास आला, ह्याचें मला राहून राहून आश्चर्य वाटतें!

बल्ल०—दुष्ट शिरोमणि दुःशासनानें जेव्हां द्रौपदीच्या निरीला हात घातला तेव्हां रागानें लाल झालेल्या माझ्या डोळ्यांनीं आपणाला शांतपणानें समाधिस्थ असल्याचें पाहिलें; त्या वेळीं एकाच कुंतीच्या उदरांतून आपण व मी दोघेहि कसे निर्माण झालों, ह्याबद्दल मला संशय आला; व तो संशय आज पुनः दुणावत आहे.–महाराज, आपणाला जर कोणाशींहि व केव्हांहि निष्ठुरपणानें वागावयाचें नाहीं व परक्यांच्याच सुखाची जेव्हां तेव्हां काळजी वाहायची, तर वनवास संपवून हा अज्ञातवास कां स्वीकारला? आपलें अजातशत्रुत्वाचें व्रत आजन्म वनवासांत राहून पूर्ण झालें असतें.

सैरं०—आणि ज्या आपल्या बंधूंनीं तुमच्या एकट्याच्या सत्यप्रियतेकरितां

राज्यसुखावर लाथ मारिली, ते आपले बंधु, तुमचा तसा हट्ट असता तर आपणाबरोबर आजन्म वनवासांतहि राहण्यास कबूल झाले असते.

बल्ल०—महाराज, क्रूरपणाशिवाय व निष्ठुरपणाशिवाय युद्धच होणार नाहीं. बाण सोडला कीं शत्रूनीं आपखुषीनें व सुखानें मरण्याला तयार व्हावें, असली युद्धकला मानवी क्षत्रियांना कधींकाळीं साधेल काय?

सैरं०—आपले पुरुष लढाईत पडले म्हणून कोणच्या शत्रूचीं बायकामुलें रडल्यावांचून राहातील?—मला वाटतें ह्या अज्ञातवासाचे दिवस कसे तरी आम्ही कंठले, आणि नंतर दुर्योधनानें आपल्या राज्याचा हिस्सा आपल्याला दिला नाहीं, तर कौरवांच्या बायका अनाथ होतील,' एवढ्या कारणावरूनच इकडून पुन्हां अरण्याचा रस्ता धरला जाईल!

कंक०—द्रौपदी, भीमा, मी पुन्हां निक्षून सांगतों कीं, आजचा हा कीचकवधाचा प्रश्न तर बाजूलाच राहूं दे, पण उद्यां अज्ञातवास संपल्यावर कौरवांचें पापाचरण अत्युत्कट झालेलें मी पाहिल्याशिवाय, व त्यांचा संहार न करतां दुसऱ्या कोणत्याहि मार्गानें कौरवांचा उद्धार होणें शक्य नाहीं असें मला वाटल्याशिवाय, सुयोधनाचा वध समरांगणावरहि करावयाला मी संमति देणार नाहीं.

सैरं०—महाराज, त्या दुरात्म्या कीचकाचें मी शरीरानें, मनानें, किंवा बुद्धीनें, कोणचेंच नुकसान केलें नाहीं. असें असतां जर माझ्याविषयीं त्याच्या मनांत पापबुद्धि प्रबल झाली व त्याला सन्मार्गावर आणण्याचे कामीं त्याची बहीण सुदेष्णा व त्याची बायको रत्नप्रभा ह्यांनींहि जर हात टेकले, तर त्याच्या ह्या उत्कट पापाबद्दल त्याचा वध करून त्या कीचकावर व अनुकीचकांवर उपकार करून—त्यांचा उद्धार करण्याची वेळ जवळ आली नाहीं काय?

बल्ल०—कीचक किंवा अनुकीचक ह्यांच्या सुतळीच्या तुकड्याचाहि लोभ पांडवांनीं कधींकाळीं केला नाहीं. कीचक किंवा अनुकीचक ह्यांच्या योग्य सुखाच्या व चैनीच्या आड क्षणभरहि जाण्याची पांडवांची इच्छा नाहीं. अशा रीतीनें आम्ही पांडव वागत असतां, पांडवांच्या सुखाचें साधन—पांड-

वांची धनदौलत–ही महासाध्वी द्रौपदी–हिचें बलात्कारानें हा कीचक हरण करूं पाहात आहे. देव आणि धर्म ह्यांना न जुमानतां आपली पापी चैन लहर लागेल त्याप्रमाणें चालविण्याची ह्याला घमेंड आहे. निरपराधी साधुतुल्य पांडवांना पिढ्यानपिढ्या कष्टमय स्थितींत लोटून देण्याचें अतर्क्य पाप करायला हे कीचक व अनुकीचक तयार झाले आहेत. तर अशा स्थितींत अजातशत्रु धर्ममहाराज, कीचकाचा वध करायला ह्या भीमाला आपली संमति मिळणार नाहीं काय ?

**कंक०**—मी कधींच परवानगी देणार नाहीं असें नाहीं; पण अद्याप वधापूर्वीचे सगळे उपाय संपले नाहींत. सुदेष्णा व रत्नप्रभा ह्यांच्या कानउघाडणीला जरी कीचक जुमानीत नसला, तरी विराट महाराजांनीं मनावर घेतल्यावर कीचकाला ह्या पापापासून परावृत्त करण्याची शक्ति त्यांच्या आंगीं आहे. (पडद्यांत–महाराजाधिराज विराट महाराज, वसंत महालांत विराजमान झाले असून सर्व द्यूतकारांनीं तेथें जमावें असा महाराजांचा हुकूम आहे हो.) द्रौपदी, ह्या बागेंतच आज द्यूत व्हायचें ठरलें असून मला तेथें हजर झालें पाहिजे; मी महाराजांपाशीं आतां हा प्रश्न काढतों, तोंपर्यंत कोणचीहि अविचाराची गोष्ट करायला प्रवृत्त होऊं नका. [ जातो. ]

**सैरं०**—प्राणनाथ, शंभर कौरवांना मारून दुःशासनाच्या रक्तानें भिजलेल्या हातांनीं माझी वेणी घालण्याची आपली प्रतिज्ञा पुरी होईल असें मला वाटत नाहीं.

**बल्ल०**—कां, द्रौपदी अशी भलतीच शंका तुझ्या मनांत येते तरी कशी ? कौरव जर माझ्या गदेच्या प्रहारानें मेले नाहींत तर हा भीम जन्मास आल्याचें सार्थकच होणार नाहीं.

**सैरं०**—कौरवपांडवांचें युद्ध सुरूं झाल्यावर प्रतिज्ञा केल्याप्रमाणें आपण पराक्रम करून दाखवाल, त्याबद्दल मला शंका नाहीं. पण आपले वडील बंधु खोट्या सत्यप्रियतेच्या नादीं लागल्यानें आपणा सर्वांना शस्त्र हातीं घेण्याचा प्रसंगच येणार नाहीं.–प्राणनाथ, हा कीचक उघड उघड माझ्यावर जुलूम करायला कमी करायचा नाहीं, व ह्या अज्ञातवासांतच द्रौपदी,—

बल्ल०—आणि द्रौपदीबरोबर सर्व पांडव,—

सैरं०—नामशेष होणार,—

बल्ल०—तशी भीति नको बाळगायला. तसाच प्रसंग येऊं दे, कीं ह्या कीचकाला भर रस्त्यावर सर्वांदेखत रथांतून ओढून काढून लाथ मारून ठार करीन, हें पक्कें लक्षांत ठेव.

सैरं०—पण असल्या कृत्यानें पांडव उघडकीला येऊन पुन्हां बारा वर्षें वनवासांत काढावीं लागतील, त्यापेक्षां मी नाहींशी होऊन—

बल्ल०—कौरवांच्या रक्तानें भिजलेल्या माझ्या हातांनीं तुझी वेणी घालण्याची माझी प्रतिज्ञा कधींहि खोटीं व्हावयाची नाहीं. द्रौपदीं, ह्यापुढें धर्मराजाच्या नादीं लागण्याचीं आह्माला जरुरीं नाहीं. तूं मला हुकूम कर; ह्याक्षणीं कीचकाला नाहींसा करतों. (पडद्यांत-ए पोरींनों, त्या पुष्पवाटिकेंत चोहोंकडे नीट पाहून सैरंध्रीचा तपास काढा. मी त्या पलीकडच्या आमराईत जरा विश्रांति घेतों.) सैरंध्री, हा पहा कीचक इकडे येतो आहे.—आतां मला हुकूम कर,—असाच्या असा ह्याला चिरडून झाडाच्या ढोलींत देतों फेंकून!—अरे रे!—ह्या वेळीं जर धर्मराजाची संमति मिळाली असती तर कीचकवध करायला ही संधि कशी नामी आली होती.—पांचाली, ह्या अधमाला यमपुरीची वाट दाखवूं का?

सैरं०—नको, प्राणनाथ नको, तिकडच्या संमतीशिवाय आम्हांला कीचकवध करायचा नाहीं; पुन्हां केव्हां तरी संधि येईल.

बल्ल०—तर मग तूं आणि मी एका जागीं असलेलीं ह्याच्या दृष्टीस पडतां कामा नये.

सैरं०—आपण ह्या झाडाच्या ढोलींत लपून बसावें, आपण इतक्या जवळ असल्यावर मला बिलकूल भीति नाहीं. आणि तशीच वेळ आली तर मी इतक्या मोठ्यानें ओरडेन कीं, वसंत महालापर्यंत माझ्या आरोळ्या सहज ऐकूं जातील. [ भीम जाऊन लपून बसतो. ] (स्वगत) ह्या चांडाळाला पाहिलें कीं मला दुःशासनाची आठवण होते.—प्रथम ह्या मेल्याच्या रक्तानें भिजलेले



बल्लभः—सैरंध्री, हा पहा कीचक इकडे येतो आहे.—आतां मला हुकूम कर,—असाच्या असा ह्याला चिरडून झाडाच्या ढोलींत देतों फेंकून !—

[ पृ. ६०.

तिकडचे हात पाहिल्याशिवाय कौरवांच्या रक्तानें माझे केंस माखले जातील असा मला भरंवसा वाटत नाहीं.—हा मेला कसें वेडे वांकडें अधमपणानें बोलतो हें धर्मराजांकडून ऐकणें झाल्याशिवाय त्यांच्या रागाची ज्वाळा चांगली प्रज्वलीत व्हावयाची नाहीं. मोठमोठ्या धाडसाच्या कृत्यांना प्रवृत्त करायला राग पुरुषांना अवश्य आहे. [ कीचक प्रवेश करितो. ]

कीच०—( स्वगत ) बरी दृष्टीस पडली. आतां हिला अशी माझ्या महालाकडे ओढून नेतों. जाते कुठें आतां ?—पहिल्या दिवशीं मीं हिला ओढून न्यावयाची गय केली तिथेंच चुकलें.—ह्या दासदासींना उठल्या बसल्या लाथा मारीत असलें पाहिजे. माझी सर्व अनुकीचकांना आज्ञा आहे, दासदासींशीं केव्हांहि एक क्षणभर गोडी गुलाबीनें बोलूं नका. उठतां लाथ आणि बसतां बुक्की, असें जर ह्यांना वागविलें नाहीं तर लगेच आम्हां कीचक—अनुकीचकांच्या बरोबरीचे आपण आहों असें ह्यांना वाटतें; आणि आमच्या मिजाशी ह्यांच्या डोळयांत खुपून आमची सत्ता ह्यांना जुलमाची भासूं लागते. असेंच केलें पाहिजे. हिच्या मुसक्या बांधून हिला भर रस्त्यांतून फरफर ओढीत महालाकडे नेली पाहिजे. ( बसतो ) सैरंध्री, ये, अशी जवळ येऊन उभी रहा.—येथें तूं काय करीत आहेस ?

सैरं०—सुदेष्णा महाराणीसाहेबांकरितां फुलें तोडीत आहें.

कीच०—सैरंध्री, माझें मन तुझ्यावर गेलें म्हणूनच माझ्या नाटकशाळेंत राहूं देण्याचा मी तुला मान देत आहें.—मी तुला तुझ्या हिताची गोष्ट सांगतों. तूं द्रौपदीची दासी होतीस नव्हे ? द्रौपदी लवकरच माझी नाटकशाळा व्हावयाची आहे; तेव्हां तुला तिची पुन्हा दासी व्हावें लागेल अशी बिलकूल भीति बाळगूं नकोस.—माझ्या नाटकशाळेचा नियम असा आहे कीं, नाटकशाळेंत शिरण्यापूर्वी कोणाचा कसा दर्जा होता, उच्च कोण नीच कोण, ह्याची बिलकूल चौकशी करावयाची नसून नाटकशाळेंत शिरल्यावर सर्व बायका एकाच दर्जाच्या होतात. पुढें द्रौपदी ही तेथेंच येईल आणि तुला उणें पाणें टाकून बोलेल, तुझ्या नीच दर्जाची ओळख देऊन तुला कमी लेखेल, किंवा

तुझा पाणउतारा करील, अशी शंकाहि घेण्याचें कारण नाहीं. माझ्या नाटकशाळेंत सर्वांना सारखाच मान व सारखाच दर्जा दिलेला आहे. हें पहा सैरंध्री, ह्या कीचकानें आजपर्यंत कोणाचींच आर्जवें केलीं नाहींत; पण तुला म्हणून तुझ्या हिताची गोष्ट सांगतों. तूं जर आपण होऊन आपखुषीनें माझ्या नाटकशाळेंत आलीस आणि जर माझें मन प्रसन्न करून घेतलेंस, तर,–मी तुझ्यावर हा उपकार करीत आहें, ह्या उपकाराला तूं पात्र आहेस असें मात्र आपल्या वर्तनानें मला दाखविलें पाहिजे,–तर हें पहा, मी द्रौपदीला देखील तुझ्या ताब्यांतील–तुझ्या हाताखालीं वागणारी–दासी करीन. पहा नीट विचार कर, हा जो मी तुझ्यावर विश्वास टाकीत आहे, त्याची जोखीम पुरती ओळखून तुला वागलें पाहिजे; नाहींतर तुझ्याविषयींची माझ्या मनांतील सहानुभूति—

**सैरं०**—मेल्या सूतपुत्रा, तोंड आटपून बोल. ही सैरंध्री आज तुला दासीच्या वेषांत असल्यासारखी जरी दिसत असली तरी दिव्य यक्षांची शक्ति हिचें संरक्षण करण्यास तयार आहे, असें तुझ्या अनुभवास येईल.

**की०**—सैरंध्री, असल्या बाष्कळ बोलण्यानें तूं मात्र आपल्या विषयींची माझ्या मनांतील सहानुभूति नाहींशी करून घेत आहेस.—ह्या अशा वल्गनांकडे व धमकावणीकडे मजसारखे धैर्यशील व प्रतापी पुरुष केव्हांच लक्ष देत नसतात. तेव्हां मला भिवविण्याचा हा तुझा प्रयत्न व्यर्थ आहे. ह्या पासून तुझें मात्र नुकसान खात्रीनें होईल हें पक्कें लक्षांत ठेव.–अग एखाद्या कंगालाची तूं मुलगी, एखाद्या दासाची तूं बायको,–यक्षांच्या पराक्रमाच्या गोष्टी सांगून आपलें हसें करून कां घेतेस? विलास ह्मणजे काय ह्याची कल्पना चुकून स्वप्नांतहि ज्याला आली नसेल अशा एखाद्या पशूच्या सहवासांत तूं आजपर्यंतच्या रात्री कंठल्या असशील. मातीच्या भांड्यांत ज्यांनीं कदान्न शिजवावें अशा भिकारड्या आजापणजांच्या झोंपडींत वल्कलें पांघरून तूं दिवस काढिले असशील; पण प्यारी, सैरंध्री, विधात्यानें तुझें शरीर सुंदर घडविल्यामुळें, तुझा दर्जा नसतांहि, तुझ्या बापजाद्यांची योग्यता नसतांहि, मजसारख्या प्रतापी व सत्ताधारी पुरुषाला तुझ्याशीं एकांत करण्यास वाईट वाटत नाहीं, ह्याबद्दल



कीचकः —या कीचकाचें मन आपल्या विलासांनीं आपल्या मुठींत घे, व माझ्या नाटकशाळेंतील अत्यंत दैदीप्यमान हिरकणी तूं हो. [ पृ. ६३.

परमेश्वराचे धन्यवाद गा; आणि अप्सरांनाहि दुर्मिळ असणारे वस्त्रालंकार अंगावर घालून, इंद्राणीलाहि दुष्प्राप्य अशा माझ्या रंगमहालांत रहावयास कबूल होऊन, सैरंध्री, जगांतील सर्व राज्यसत्ता ज्याचे ठिकाणीं एकवटली आहे अशा या कीचकाचें मन आपल्या विलासांनीं आपल्या मुठीत घे, व माझ्या नाटकशाळेंतील अत्यंत दैदिप्यमान हिरकणीं तूं हो.

**सैरं०**—पाप्या अनुकीचकांची तुला पूर्ण मदत असल्यामुळें विराट महाराजांना जरी तूं कस्पटाप्रमाणें लेखीत असलास, आणि मत्स्यदेशांत आपणाहून दुसरा कोणी अधिक श्रेष्ठ नाहीं अशी जरी घमेंड तुला वाटत असली, तरी सर्वांचा न्याय करण्यास परमेश्वर बसला आहे, हें ध्यानांत ठेव. साध्वींचा छळ करण्याच्या तुझ्या या पापामुळें तुझ्या शक्तीला कीड लागून अमर्याद वाटणारी तुझी सत्ता हां हां म्हणतां ढांसळून पडेल. चांडाळा, सदाचारी लोकांचा नाहक छळ करण्याच्या तुझ्या पापामुळें क्रुद्ध झालेल्या परमेश्वरी शक्तीचे दूत, तुझ्या पापाचा घडा केव्हां भरेल म्हणून, तुझ्या भोंवतीं घिरट्या घालीत असून तुझा बळी घेण्यास टपलेले आहेत.—पापाचा मद तुझ्या डोळ्यावर चढलेला असल्यामुळें हे दिव्यदूत तुला दिसत नाहींत; पण दुष्टा राक्षसा, हें पक्कें लक्षांत ठेव, पापाच्या मार्गांत एक पाऊल आणखी पुढें टाक म्हणजे ते दिव्यदूत येथें प्रगट होतील. पाप्या, विराटाला बगलेंत मारून एवढी प्रचंड राजसत्ता चुटकी वाजवितां वाजवितां तूं मुठींत घेतलीस म्हणून जे लोक आज चकीत झाले आहेत, तेच लोक पापाच्या एक दोन मिटक्या कीचक मारतो न मारतो तोंच त्याचा कसा नाश झाला म्हणून आश्चर्य करूं लागतील.

**कीच०**—सैरंध्री, असल्या ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगण्याचा आव घालून तूं आपलें नुकसान करून घेत आहेस.—तुला माझ्या नाटकशाळेंत आलेंच पाहिजे. ही गोष्ट ठरलेली असूनें कालत्रयीं ही फिरणारी नाहीं. मग उगीच पापपुण्याचें चर्‍हाट वळून, माझ्या मनांतील तुजविषयींची सहानुभूति—

**सैरं०**—कसलीरे मेल्या सहानुभूति? आग लागो तुझ्या या सहानुभूतीला! सहानुभूति, सहानुभूति, म्हणून आम्हां सर्वांना तुझ्या रांडाच बनविणार कीं नाहीं!

—ह्या गाढवाला आपल्या ह्या असल्या सहानुभूतीचा दिमाख दाखवायलाहि लाज वाटत नाहीं !

**कीच०**—(उठून) रांडरूं तें रांडरूं आणि ढंग पहा कसा पतिव्रतेचा आणला आहे.—सैरंध्री, एवढें समजण्याची तुला अक्कल नाहीं, तूं जर एवढी मोठी सद्गुणी असतीस तर अशी दासी कां झाली असतीस !—न्यायान्यायाच्या गोष्टी आणि म्हणे दासदासींच्या तोंडांत !—सैरंध्री, तूं काय समजली आहेस ! कौरवांनीं तुझ्या यजमाननीला—द्रौपदीला—रथी, अतिरथी, महारथी अशा पोक्त व वयोवृद्ध महानुभावांच्या सभेंत स्वतःच्या हातांनीं नग्न करण्याचा प्रयत्न केला, पण—मी—हा कीचक—एकाद्या अनुकीचकाच्या नोकराकडून भर बाजारच्या चव्हाट्यावर तुला उघडी नागडी करील; आणि माझी नाटकशाळा होण्याच्या मानास मुकशील इतकेंच नव्हे तर, एखाद्या क्षुल्लक अनुकीचकाची रंडी होऊन तुला दिवस कंठावे लागतील. चल, तुला अशी ओढून माझ्या महालाकडे नेतों. (हात धरतो.) बोलाव तुझे यक्ष, किन्नर, देवदूत, कोण कोण तुझ्या साह्याला येणारे आहेत त्या सर्वांना बोलाव. त्या सर्वांच्या देखत तुझी अब्रू घेऊन—

**सैरं०**—धांवा हो धांवा, दुष्ट लांडग्यापासून ह्या गाईचें संरक्षण करा.

**कीच०**—या, कोण कोण देवदूत, देव, महादेव येणार असाल ते या. माझ्या कचाट्यांतून सैरंध्रीला सोडण्याची कोणाची प्राज्ञा आहे तें पाहूं दे.—या, या, (सै० पूर्वोक्त ओरडते) सर्वांना माझें हट्टाचें आमंत्रण आहे. दृश्य, अदृश्य, सर्व शक्ति येऊं देत.—सर्वांना डाव्या हातानें थोपवून धरून—या उजव्या हातानें तुझा पदर ओढून—तुझी अब्रू घेतली नाहीं तर हा कीचक क्षणभरहि पृथ्वीतलावर जिवंत राहणार नाहीं. (सै० पूर्वोक्त पुन्हां ओरडते) (कीचक पदर ओढूं लागतो,)—गाईचें रक्षण करावयाला बोलाव, पुन्हां हंबरडा फोडून बोलाव, कोणता बैल मरायला पुढें येतो तें पाहूं दे.

(रत्नप्रभा व सुदेष्णा प्रवेश करितात)

**र० व सु०**—(दोघी मिळून) महाराज काय हा अविचार—असलें पाप !

रत्न०—सोडून द्या, गरीब गाईला सोडून द्या.

सुदे०—गरीब अबलेवर बलात्कार करण्यांत काय बरें पुरुषार्थ आहे ?

[ कीचक सैरंध्रीला सोडून देतो. ]

कीच०—सैरंध्री, कोणचाहि पुरुष, किंवा कितीहि अक्षौहिणी पुरुषांचें सैन्य तुझ्या मदतीस या वेळीं धांवून आलें असतें, तरी या वेळीं तुला सोडली नसती. पण कांहीं प्रसंगच असे चमत्कारिक असतात कीं लग्नाचे बायकोपुढें पुरुषांना गयच खावी लागते.—आतां ह्या वेळेस तुला सोडली खरी; पण ज्या ह्या सूर्यनारायणाचे देखत तुला ओढणार होतों, तो हा सूर्यनारायण अस्ताला जाण्यापूर्वींच त्याला आपल्या कोट्यवधि डोळ्यांनीं सैरंध्रीला माझ्या नाटकशाळेंत शिरतांना पहावें लागेल, आणि आजची रात्र संपून सूर्यानें पुन्हां आपले डोळे उघडल्यावर कीचकानें उपभोगिलेली सैरंध्री त्याच्या नजरेस पडेल.—सुदेष्णा महाराणीसाहेब, मी ही माझी प्रतिज्ञा सूर्यनारायण व मत्स्यदेशाची अभिषिक्त महाराणी ह्यांच्या देखत केली असून, माझ्या प्रतिज्ञेप्रमाणें माझ्या मनगटाच्या जोरावर मी सर्व गोष्टी घडवून आणणार.—विराट महाराज आणि कीचक व अनुकीचक यांच्यामध्यें उघड दुष्मानगिरी उत्पन्न होऊं नये, अशी जर आपली इच्छा असेल, तर तुमच्या ह्या दासीला—माझ्या आजचे रात्रीच्या नाटकशाळेला विलासी अभिसारिकेस साजेल असा शृंगार घालून, पुष्पमालांनीं सुशोभित करून, मद्याचीं सुवर्णपात्रें हातांत देऊन,—सूर्य दोन घटका बाकी असतांच--मजकडे पाठवाल.—दोन घटिका दिवस असतांना जर ही तुमच्या राजवाड्यांतून बाहेर पडली नाहीं, तर मी विराटमहाराजांचा कोणी नव्हे, न विराट माझा कोणी नव्हे.

( पडदा )

अंक तिसरा समाप्त.

---

# अंक ४ था.



## प्रवेश १ ला.



स्थळ—राजवाड्यांतील पटांगण.—सौदामिनी व मैत्रेय प्रवेश करितात.

मैत्रे०—सैरंध्रीचें मन वळविण्याचें काम आपल्या हातून होत नाहीं.

सौदा०—कंकभट काय म्हणतो ?

मैत्रे०—अग जुवेबाज तो—महाराज आणि हा भट जुवा खेळण्यांत गुंग आहेत! माझ्याशीं बोलायला कंकभटाला वेळ नाहीं; आणि सुदेष्णा महाराणीसाहेब, रत्नप्रभाराणीसाहेब, महाराजांच्या दर्शनाला आल्या होत्या, त्यांच्याशीं बोलायला महाराजांना वेळ नाहीं.—पांडवांच्या युधिष्ठिर राजानें द्यूत खेळून जसा आपला नाश करून घेतला, तशीच ह्या विराट राजाची स्थिति होणार. जुव्यापुढें राजकाजाकडे बघायाला वेळ कुठें आहे!—कीचक व अनुकीचक अशानेंच प्रबल झाले.

सौदा०—आतां अगदीं आणीबाणीची वेळ आली, आणि हा कंकभट जुव्यांत गढलेला! पुरा मेला जुवेबाज.—सुदेष्णा महाराणीसाहेबांनीं आतां सैरंध्रीला अगदीं निक्षून हुकूम केला, दोन घटका दिवस बाकी असतांना मद्याचीं सुवर्णपात्रें घेऊन कीचकमहाराजांच्या महालाकडे गेलेंच पाहिजे म्हणून.

मैत्रे०—मग सैरंध्री काय म्हणाली?

सौदा०—जीव देईन पण कीचकाला आंगाला हात लावूं देणार नाहीं.

मैत्रे०—जीव दिला तर तुझें बरेंच होईल. तुझी एक सवत आयती नाहींशी झाली कीचकमहाराज—दोन दिवस शोक करतील—मग आपोआप तुझ्याच नादीं—

सौदा०—माझ्या मनांत आतां एक युक्ती आली आहे! असें करावें म्हणतें, सैरंध्रीचें मन वळवून मद्याचीं पात्रें घेऊन इथून तर तिला बाहेर



सिद्धपाकः—महादासीसाहेब, हा मोठा पंडित आहे.— [ पृ. ६७

मडावयास लावावी, आणि मग तें मद्य आपल्या हातीं घेऊन हळूच कीचक महाराजांच्या रंगमहालांत प्रवेश करावा. कीचक महाराज नेहमींच सायंकाळीं मद्यपान करतात; शिवाय माझ्या हातांतील मद्य प्राशन केल्यावर मग काय होईल आणि काय नाहीं!

मैत्रे०—युक्ती तर खाशी आहे!--आज सायंकाळीं तूंच कीचकमहाराजांची नाटकशाळा होणार. मग आह्मांला किती कंठे बक्षीस देवविणार!

सौदा०—बक्षीस पुष्कळ कंठे मिळतील; पण मी म्हणतें तसें करा. कंकभटाकडून सैरंध्रीचें मन तेवढें वळवा.

मैत्रे०—तें काम माझें, हा लागलों त्या उद्योगाला. [ जातो ]

सौदा०—( स्वगत. ) हा जुवेबाज कंकभट जुवा सोडून असल्या गोष्टीकडे कुठून लक्ष देणार! ह्याच्यावर विसंबून राहून सोय नाहीं. बल्लभ आचाऱ्याच्या मार्फत उद्योग आरंभला पाहिजे. हा कोण हातांत पळा घेऊन येतो आहे. हा बल्लभाच्या हाताखालीं परवां नेमलेला सिद्धपाक दिसतो. ह्याला विचारलें म्हणजे बल्लभ आचारी ह्यावेळीं कुठें आहे तें समजेल.

[सिद्धपाक व विद्याधर प्रवेश करितात.

सिद्ध०—विद्याधर, ह्याच त्या दासीसाहेब, ज्यांच्याकडे बल्लभ महाराजांनीं आम्हांला पाठविलें.--तुझें नशीब सवाई कीचक असलें पाहिजे, नाहीं तर इतक्या ताबडतोब कुठचें दर्शन व्हायला!--पड, पाया पड, एकदम पाया पड.

[विद्याधर साष्टांग नमस्कार घालून, गुढगे टेकून हात जोडून बसतो.]

सौदा०—कायरे, सिद्धपाक, हें काय प्रकरण आहे!

सिद्ध०—महादासीसाहेब, हा मोठा पंडित आहे.--ह्यानें गुरुजींच्या घरीं विद्याभ्यास-किती वर्षे-किती वर्षे रे विद्याधर!

विद्या०—बारा पंधरा वर्षे, मेहेरनजर दासीसाहेब.

सिद्ध०—ह्यानें पंधरा वर्षे अध्ययन करून मोठमोठ्या ज्ञानवृद्धांनीं ह्याला अजिंक्यपत्र लिहून दिलें आहे.—काय लिहिलें आहेरे त्यांत! बोल-बोल.

विद्या०—तीन सभा जिंकल्या आहेत म्हणून, महादासीसाहेब.

सिद्ध०—हा महापंडित आहे. पंडितांच्या सभेंत कोणासारखा शोभतो-हा कोणासारखा--मी विसरलों—कोणासारखा—प्राचीन ऋषींचीं नांवें माझ्या टाळक्यांत टिकावच धरुन रहात नाहींत.—कोणासारखारे ?

विद्या०—बृहस्पतीसारखा, मेहेरबान दासीसाहेब.

सौंदा०—मग ह्याचें पुढें काय ?

सिद्ध०—ह्याचें असें झालें—काय झालें—काय झालेंरे ?

विद्या०—कोठें वृत्ति मिळेना म्हणुन माझी उपासमार चालली आहे, दीनदयाळ महादासीसाहेब.

सौंदा०—ह्या पंडिताची अशी दीनस्थिति पाहून मला ह्याबद्दल फार कींव येते !—गरीब बिचारा पुरुषांच्या जन्माला न येतां बायकांच्या जर जन्मास आला असता, तर एखाद्या अनुकीचकाच्या नाटकशाळेंत तरी ह्याला चिकटून दिलें असतें.

सिद्ध०—ह्याला अर्थशास्त्र येतें—ज्योतिषशास्त्र येतें—हा वैय्याकरणी आहे—आहेस नारे ?

विद्या०—आहें, सरकार.

सिद्ध०—गणिती आहे, आहेस नारे ?

विद्या०—आहें, गरीबपरवर.

सिद्ध०— ह्याला इतिहास येतो; येतो नारे ?

विद्या०—येतो, हुजूर.

सिद्ध०—ह्याला छंदशास्त्र येतें; येतें नारे ?

विद्या०—येतें; दयानिधे महादासीसाहेब.

सौंदा०—ऊठ, ऊठ, तुला काय येत नाहीं तें सांग, म्हणजे थोडक्यांत आटपेल.

विद्या०—(उठून) पाकशास्त्र येत नाहीं, आणि पाकशास्त्राला लागणारी सामुग्री मिळवितां येत नाहीं; बाकी सर्व येतें, दयासागर महादासीसाहेब.

सिद्ध०—म्हणूनच हा उपाशी मरतो, महादासीसाहेब.--हा मोटा पंडित

आहे खरा, पण एकाद्या अनुकीचकाची नाटवंशाळा किंवा दासी होऊन पोट भरील म्हणावें तर हा बायको नाहीं ! नाहींमना ?

विद्या०—दुर्दैवानें पुरुषाच्या जन्माला आलों; भाग्यावतार महादासीसाहेब.

सिद्ध०—वाणिज्यवृत्ति करील म्हणावें तर भांडवल नाहीं; आहे, भांडवल आहे ?

विद्या०—पोथ्यापुस्तकांत सगळें गमावलें, द्रव्यावतार महादासीसाहेब.

सिद्ध०—असा हा उपाशी मरतो आहे, म्हणून बल्लभ आचारी महाराजापाशीं गोष्ट काढली--सैरंध्रीमहादासीवर कीचकमहाराजांचें मन असून सैरंध्रीमहादासीसाहेब जरा बल्लभमहाराजांच्या तंत्रानें आहेत तेव्हां सैरंध्रीमहादासीसाहेबांच्या मार्फत वशिला—

सौदा०—मग सैरंध्रीमार्फत कांहीं वशिला नाहीं लागत ?

सिद्ध०—बल्लभमहाराज म्हणाले, सैरंध्रीमहादासीसाहेब रुसून बसल्या असून इतर दासीसाहेबांत सौदामिनी दासीसाहेबांच्या इतकें वजन कीचकमहाराजापाशीं दुसऱ्या कोणाहि दासीसाहेबांचें नाहीं. कीचकमहाराज केव्हां केव्ह शेंबडी, लोचट अशा सलगीच्या शिव्या देण्याचा अनुग्रहहि सौदामिनी महादासीसाहेबांवर करीत असतात, अशी या पायांची तारीफ बल्लभमहाराज करीत होते. ह्या गरीब पंडितावर मजमुळें बल्लभमहाराजांचें प्रेम असून, आतां इतक्यांत येऊन ते स्वतः रदबदली करणार आहेत.

सौदा०—बरें, ते आले म्हणजे मी पलिकडे महालक्ष्मीचे मंदिरांत आहें तेथें त्यांना पाठवून दे. (स्वगत) हा बल्लव—ह्या पंडिताकरितां—माझीं आर्जवें करण्यास येत आहे, हें माझ्या पथ्यावरच पडलें म्हणायचें. आतां त्याच्याकडून सैरंध्रीचें मन वळविलें म्हणजे सैरंध्रीच्या ऐवजीं मीच आज संध्याकाळीं मद्याचीं सुवर्णपात्रें घेऊन कीचकमहाराजांच्या रंगमहालांत शिरणार. [ जाते ]

सिद्ध०—चल, विद्याधर, बल्लभमहाराजाकडे. आतां तुझें काम फत्ते झालें म्हणून समज. अरे, आजकाल बिनपैशाच्या वशिल्याचे मार्ग दोन.

एक कीचक किंवा अनुकीचक ह्यांच्या घरीं असणाऱ्या अस्मादिकासारख्या पाकाधिकाऱ्याचीं आर्जवें करावींत, आणि दुसरा कीचक किंवा अनुकीचक यांच्याकडून गुप्त किंवा उघड नाटकशाळेचा मान मिळालेल्या एकाद्या सौदामिनीच्या पाया पडावें !

विद्या०—आतां माझे वशिले दुहेरी झाले, तेव्हां मला लहानशी तरी वृत्ती खात्रीनें मिळणार. [ जातात ]

---

## प्रवेश २ रा.

स्थळ—कीचकाचे महालापुढील पटांगण--सौदामिनी, मद्याचीं सुवर्णपात्रें हातांत घेतलेली सैरंध्री व बल्लभ प्रवेश करितात.

सौदा०—गडे सैरंध्री, आजच्या आनंदासारखा आनंद मला कधींच झाला नव्हता. रात्रीच्या कोमल सुखाच्या लहरींत मी गढून गेलेली असल्यामुळें ह्या मावळत्या सूर्याचे आरक्त किरण मला कामोद्दीपक शशिप्रभेनेंच न्हावूं घालता आहेतसें वाटतें, आणि प्रियाच्या समागमाकरितां उत्सुक झालेल्या ह्या अभिसारिकेस तिकडच्या रंगमहालापर्यंत पोंचवावयास आलेली तूं दूति असावीस असा मला भास होतो. खरेंच गडे सैरंध्री, ह्या रस्त्यांतील कोणाच्याहि महालाचा दरवाजा दिसला तरी तिकडच्या रंगमहालापाशीं आलोंसें मला वाटे, व कोणचाहि पुरुष दृष्टीस पडला तरी तिकडूनच येणें झाल्याचा भास होऊन दोनतीनदां तर आमच्या सोबतीस आलेल्या ह्या बल्लभाला पाहूनच कीचकमहाराज फारच जवळ आलेसें समजून मी लाजलेंहि !

बल्ल०—सौदामिनी, आपण खरेंच कीचकमहाराजांच्या महालापाशीं आलों. हीं मद्यपात्रें हातांत घेऊन तूं आंत प्रवेश कर व सैरंध्रीच्या ऐवजीं मी मद्य पोंचवावयाला आलें आहे, अशी त्यांना विनंति कर.

[ सैरंध्री मद्यपात्रें सौदामिनीच्या हातीं देते ]

सौदा०—सैरंध्री, आपलें पूर्वी ठरल्याप्रमाणें तूं दरबारांत जाऊन विराट महाराजांपाशीं आपली विनंति सादर कर.—इकडे कीचकमहाराजांचें मन रंजविण्याचा मी प्रयत्न करितें, व परमेश्वरानें मला यश दिल्यास तुझेंहि काम आयतेंच झाल्यासारखें होईल.—माझ्या सौंदर्यसामर्थ्यावर माझा पूर्ण विश्वास असून कीचकमहाराजांपासून ह्यापुढें तुला खात्रीनें कांहीं त्रास होणार नाहीं. निर्धास्तमनानें तूं आतां ह्या बल्लभाबरोबर विराट महाराजांचे दरबाराकडे जा. मी आतां तिकडच्या महालांत प्रवेश करितें. [ सौदामिनी जाते. ]

बल्ल०—द्रौपदी, ही वेळ तर आपण कशीबशी मारून नेली.—आतांच्या आतां मद्यपात्रें घेऊन बाहेर पड असा जर सुदेष्णा महाराणीसाहेबांनी हुकूम केला नसता तर ह्या हलकट दासीच्या युक्तीकडे लक्ष देण्याचेंच आम्हाला कारण नव्हतें.—पण दरबारांत सायंकाळीं तुझ्या विनंतीचा विचार करीन असें विराट महाराजांनीं दादांना सांगितले, आणि इकडे तर महाराणीचा असा हुकूम !

सैरं०—मद्यपात्रे घेऊन जावयास मी निघालें असे पाहून महाराणीसाहेबांना बरें वाटलें खरें, पण आतां दरबारांत मला पाहिल्यावर त्या पुन्हा रागावतील.

बल्ल०—पण दादांचे म्हणणें असें आहे, विराट महाराज तुझ्या विनंतीचा विचार तुझ्यासारखाच करतील, मग ह्या मागच्या गोष्टी आपोआप मिटतील.

सैरं०—त्यांची आज्ञाच आहे, तर मी येऊन विनंति करीन बापडी !—विराट महाराज, सुदेष्णा महाराणीसाहेब, रत्नप्रभा राणीसाहेब, ही सर्व मंडळी एका ठिकाणीं जमून त्यांनीं माझें म्हणणें नीट ऐकून घेतल्यावर योग्य न्याय करण्याकडे त्यांची प्रवृत्ति होईल, ह्यांत संशय नाहीं. पण महाराज, माझ्या मनाला आपलें असें वाटतें, तो मेला कीचक रस्त्यांतच आम्हांला गाठील किंवा आम्हीं दरबारांत पाय ठेवतों न ठेवतों तोंच राक्षसासारखा आमच्यापुढें उभा राहील.—कीचक व अनुकीचक हे सांप्रत इतके प्रबल आहेत, कीं त्यांचीं कृत्यें विराट महाराजांना कितीहि अन्यायाचीं व जुलमाचीं वाटलीं तरी त्यांच्या

हेक्यापुढें व हट्टापुढें विराट महाराजांना हातच टेकावे लागतील. महाराज, ह्या कीचकाचा उद्दामपणा पाहिला म्हणजे, जगांत परमेश्वर नाहीं ही कल्पना मूर्तिमंत पृथ्वीतलावर डौलानें वावरत आहेसें वाटतें, व परमेश्वराची बेअब्रू करणाऱ्या ह्या पापी प्रदर्शनाचा भपका पाहून साधुसंतांना जंगलांत व पर्वतांत दडून बसणें भाग पडलें असावें असा मला भास होतो.—महाराज, माझ्या मनाची पक्की खात्री आहे कीं, आतांच्या अर्जीचा कांहीं उपयोग होणारा नसून आपल्या पायांत रुतणारा कांटा दुसऱ्यांनीं काढण्याची वाट न पाहतां आपला आपणच—

बल्ल०—कांहीं फायदा झाला नाहीं तरी दादाच्या मनाचें तरी समाधान होईल.

सैरं०—म्हणूनच मी झालें तरी विनंति करण्यास येत आहें.—एखाद्या द्वाड वात्रट पोरानें कोठून तरी तलवार मिळवून जर ज्याच्या त्याच्यावर तो वार करूं लागला, तर त्याच्या हातांतील ती तलवार काढून घेऊन त्याचें कल्याण करणें थोर माणसांचें कर्तव्य नाहीं काय ? हा कीचक मदांध होऊन जर निरुपद्रवी आणि निराश्रित लोकांना पीडा करूं लागला, आणि विचारी पुरुषांनीं कितीहि कानउघाडणी केली तरी जुमानिनासा झाला, तर त्याच्या पापाचरणाचें साधन—त्याचें तें पापमय शरीर—त्याच्या हातून काढून घेणें, हें प्रत्येक धर्मनिष्ठाचें पवित्र काम नाहीं काय ?

बल्ल०—म्हणूनच मी म्हणतों कीं, आतां दरबारांत जाऊन विनंति केलीच पाहिजे, म्हणजे सर्वच प्रसंग धर्मराजांचे लक्षांत येईल, व कीचकवधास त्यांची संमति मिळेल.—शिवाय ह्या सायंकाळच्या दोन घटका असल्या वाटाघाटींत निघून गेल्या म्हणजे पुढील कार्यास अनुकूल असा रात्रीचा समय सृष्टीच्या रहाटगाडग्याच्या क्रमानें आपोआप प्राप्त होईल.—चल सैरंध्री, लवकर पाऊल उचल, नाहीं तर तूं म्हणतेस त्याप्रमाणें तो दुरात्मा आम्हांस कदाचित् रस्त्यांतच गाठील, व योग्य समयाचे आधीं भलतेंच कृत्य माझ्या हातून होऊन पुन्हा बारा वर्षें वनवासांत काढावीं लागतील. [ सैरंध्री व बल्लभ जातात. ]

( दुसऱ्या बाजूनें कीचक सौदामिनीस गचांडी मारून हाकून लावीत आहे, असा प्रवेश करितो. )

**कीच०**—बदमाष, लोचट—पाजी—लाथ मारून कंबरडें मोडतों.

**सौदा०**—आपल्यावरील प्रेमामुळें अंध होऊन मी येथें आलें—

**कीच०**—तुला खरी आंधळी करून येथून पाठवून देतों.—ह्या हलकट लोकांना एखादी मलगीची शिवी दिली तरी लागले बरोबरच्या नजरेनें आम्हांकडे पहावयाला.—पायांतलीं खेटरें पायांतच पाहिजेत.—गद्धी, निर्लज्ज, बाजारबसवी—चल हो चालती.—पाजी, बेशरम.—सुदेष्णेनें हिला माझ्याकडे मद्यपात्रें घेऊन पाठविली हं!—एखादी बाजारांतली रंडी मजकडे पाठविली म्हणजे ह्या कीचकाची हौस भागली, असा मला नादान समजतात काय?—आमच्याशिवाय चालेल असा विराटाला व सुदेष्णेला गर्व झालेला दिसतो.—बदमाष, लोचट, ( लाथा मारीत ) प्रथम तुझीं हाडें मोडतों मग तुझ्या यजमानणीचीं.

**सौदा०**—नाहीं हो त्यांनीं मला पाठविलें नाहीं; सैरंध्री व मी येथपर्यंत आलों—

**कीच०**—मग सैरंध्री कोठें गेली?

**सौदा०**—सैरंध्री आपणाला शिव्या—शाप देत होती. असल्या नाटकशाळेपासून आपणाला सुख होणार नाहीं, असें समजून आपल्यावरील माझ्या प्रेमानें मला आपल्या महालांत ढकललें; व सैरंध्री दरबारांत गाऱ्हाणें गाण्याकरितां निघून गेली.

**कीच०**—असें काय?—तर मग तुझ्या या पाजी लोचटपणाबद्दल सैरंध्रीची वाटेंत गांठ पडेपर्यंत तुझा कान धरून तुला ओढीत नेतों—सैरंध्री असेल तेथें गांठतो. आजच्या रात्रीं मी माझी प्रतिज्ञा पुरी करणार. विराट—सुदेष्णा—कोण पाहिजे ते माझ्या प्रतिज्ञेच्या आड येवोत—त्या सर्वांना पायाखालीं तुडवून कीचकाच्या शब्दाविरुद्ध ब्र काढण्याची प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचीहि छाती नाहीं, हें मी माझ्या कृतीनें सर्व मत्स्यदेशाला आज रात्रीं जाहीर करणार.

[ सौदामिनीचा कान धरून ओढीत नेतों. ]

---

## प्रवेश ३ रा.

---

**स्थळ—विराटाचा दरबार. विराट** सिंहासनावर बसला आहे. **सुदेष्णा, रत्नप्रभा,** एका बाजूस बसल्या आहेत; **गुरु, पुरोहित,** दुसऱ्या बाजूस बसले आहेत; दासदासी चौऱ्या वारीत आहेत; **मंदहासिनी रत्नप्रभेच्या व सुदेष्णेच्या** मागें उभी राहून दोघींवर चौरी वारीत आहे; **कंकभट गुरु पुरोहितांच्या** मागें उभा आहे; असा देखावा.

**विरा०**—गुरुमहाराज, पुरोहितमहाराज, कंकभटजींनीं केलेली विनंति आपण आतां ऐकलीच आहे. ह्यासंबंधानें धर्माज्ञा काय आहे ती आपणापासून ऐकावी अशी माझी इच्छा आहे.

**गुरु०**—महाराज, धर्माज्ञेसंबंधानें ह्या बाबतींत संशयाला जागाच नाहीं. कोणी कोणावर जुलूम करावा, असें धर्म कधींच सांगणार नाहीं.

**पुरो०**—स्त्रियांवर बलात्कार करणाराला धर्मानें कांहीं प्रसंगीं तर कटाग्नीचें देहांत प्रायश्चित्त सांगितलें आहे; तथापि आपद्धर्म म्हणून—

**गुरु०**—प्रायश्चित्ताच्या शिक्षेची अंमलबजावणी करण्याचा प्रसंगच येऊं न देणें, हें राजाचें खरें कर्तव्य आहे. असें झालें म्हणजे आपद्धर्माचा प्रश्नच निघत नाहीं.

**सुदे०**—पण ही वाटाघाट घेऊन काय करावयाची ? सैरंध्री कीचकमहाराजांकडे मद्यपात्रें घेऊन गेली आहे.—सैरंध्रीच्या ह्या समंजसपणानें सर्वच विघ्न आपोआप टळलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**कंक०**—महाराणीसाहेब, आपला राग होऊं नये एवढ्याच करितां सैरंध्री मद्यपात्रें घेऊन कीचकमहाराजांच्या महालाकडे गेली आहे. ह्या सिंहासनापाशीं मीं केलेल्या विनंतीचा आतां विचार करण्याचें महाराजांनीं दिलेलें आश्वासन तिला माहीत असून कोणाबरोबर तरी मद्य आंत पोंचवून गेल्या पावलींच ती ह्या दरबाराकडे परत येणार आहे.

**रत्न०**—महाराणीसाहेब, मला वाटलेंच होतें, सैरंध्री ह्या गोष्टीला आपणाच होऊन कधीं कबूल होणार नाहीं.—काय असेल तें असो, यक्षकिन्नरांचें साह्य

तिला आहे म्हणून ती म्हणत होती, तें कांहीं खोटें नसावें; आणि हा विचार मनांत आला म्हणजे ह्या पापाचरणापासून तिकडचें मन कसें परतेल, ह्याची मला काळजी लागून रहाते. म्हणून म्हणतें सरकारानीं जर ह्या बहिणीची विनंति ऐकून तिकडच्या महालापर्यंत येण्याची मेहेरबानी केली आणि सर्व गोष्टी तिकडे समजून सांगितल्या तर सरकारच्या शब्दाला तिकडून मान मिळाल्याशिवाय राहणार नाहीं.

विरा०—ह्या प्रसंगीं काय करावें, हेंच मला बरोबर समजत नाहीं. मन द्विधा होत असून पाप व पुण्य हीं दोन्ही मला सारखींच भयंकर वाटत आहेत.—कंकभटजी, दहा बारा वर्षांपूर्वींची गोष्ट आहे; पांडव कौरवांच्या दरबारांत तुम्ही वागलेले आहांत, तेव्हां तुम्हांस मी आतां सांगणार ती गोष्ट माहीत असली पाहिजे.—पांडव वनवासाला गेल्यानंतर व्यासादिक महर्षी धृतराष्ट्र महाराजांचे दरबारांत गेले होते. त्या वेळीं सम्राट सुयोधनाचे कृत्याबद्दल नानाप्रकारें त्यांनीं धृतराष्ट्र महाराजांचा निषेध केला व पांडवांना वनवासास पाटविल्याच्या पापापासून मुक्त व्हावयाचें असेल तर दुर्योधनाचा त्याग केल्याशिवाय भागावयाचें नाहीं, असें त्यांनीं निक्षून सांगितलें. अशा समयीं धृतराष्ट्र महाराजांनीं दिलेलें उत्तर आपण सर्वांनीं मनन करण्यासारखें आहे.—गुरुमहाराज, पांच वर्षांपूर्वीं आपण हिमाचलाच्या यात्रेला जाऊन परत येतांना हस्तिनापुरांत आपण ही हकीगत ऐकून आम्हांस सांगितली होती नव्हे ?

गु०—होय महाराज, मी अगदींच विसरून गेलों होतों. सरकारची स्मरणशक्ति विलक्षण आहे !

पुरो०—हें काय सांगावें !—सरकार, धृतराष्ट्र महाराजांनीं कोणतें उत्तर दिलें ?

विरा०—धृतराष्ट्र महाराज सर्व ऋषींना म्हणाले, सुयोधनाचा दुर्योधन होवो, कांहीं झालें तरी कौरवेश्वर माझा मुलगा आहे. त्यानें सदाचारी व्हावें, पुण्यमार्गानें त्यानें स्वर्ग जिंकावा, अशी माझी मनापासून इच्छा असून त्याप्रमाणें मी त्याला वेळोवेळीं उपदेशहि करीत असतों. तो पापमार्गानें चालला

आहे हें मला समजतें; पण माझा उपदेश तो ऐकत नाहीं एवढयाच करितां— पुत्रप्रेमामुळें म्हणा किंवा सर्व जग ज्या स्वार्थानें व्यापलें आहे त्या स्वार्थाचा पगडा इतरांप्रमाणें मजवरहि बसलेला असल्यामुळें म्हणा,—मजपासून माझ्या हातानें त्याला ढकलून देण्यास मी तयार नाहीं. आपल्यासारख्यांच्या बोधामृतामुळें तो पुन्हा ताळ्यावर येईल, किंवा पापमार्गांत ठेंच लागल्यानें पुन्हा शुद्धीवर येऊन माझ्या उपदेशाप्रमाणें वागेल, ह्या आशेनें मी माझ्या सुयोधनाला नेहमीं माझ्या हृदयापाशीं कवटाळून धरणार.

सुदे०—ह्यावर ते ऋषी काय ह्मणाले ?

विरा०—राजा, तुझ्या सर्व कुळाचा नाश होण्याची वेळ जवळ आली म्हणून समज, असा ते शाप देऊं लागले; तेव्हां त्या ज्ञानशील धृतराष्ट्रानें द्रौपदीवस्त्रहरणाचे प्रसंगीं द्रौपदीला वरप्रदान करून उत्कट पापापासून दुर्योधनास आपण कसें परावृत्त केलें, ह्याची हकीगत ऋषीवर्यांना सांगून, सर्व ऋषींनीं मिळून दुर्योधनाचें मन वळवून त्याला पुन्हा सुयोधन करावें अशी विनंति केली.

रत्न०—त्या विनंतीचा काय परिणाम झाला ?

विरा०—कीचकमहाराजांना ‘ द्रौपदीपति ’ हा किताब देऊन कौरवेश्वरानें हस्तिनापुरांत त्यांचें आदरातिथ्य कसें केलें, हें आपणांस माहीत असल्यामुळें ऋषीवर्यांनीं केलेल्या उपदेशाचा परिणाम कौरवेश्वराच्या मनावर काय झाला, हें मी सांगण्याचें कारण नाहीं.—गुरुमहाराज, धृतराष्ट्र राजाच्या मनाची त्या वेळीं जी स्थिति होती तीच आज माझ्या मनाची आहे.—कीचकमहाराज मला माझ्या भावाहून अधिक प्रिय आहेत. तथापि सैरंध्रीवर बलात्कार करणें हें पाप आहे अशीच माझी दृढ समजूत असल्यामुळें कसें करावें, काय करावें, असें मला होऊन गेलें आहे. मनाचा पक्का निश्चय कांहींच करवत नाहीं.— प्रेम व स्वार्थ ह्यांच्या कचाटींतून बाहेर पडणें मुष्किलीचें आहे, असें मला वाटतें; म्हणून सैरंध्री आपण होऊन कीचकमहाराजांच्या महालाकडे गेली असें मीं ऐकलें तेव्हां मला संकट टळलेसें वाटलें.

कंक०—महाराज, मध्येंच बोलतों ह्या कसुरीबद्दल माफी असावी.—कोठें पापाचरण होत असेल तर तें हुडकून काढून त्याचा बंदोबस्त करण्याकरितां राजांचीं सिंहासनें स्थापलेलीं असतात. रामराज्यांत एक मनुष्य अकालीं मरण्याबरोबर ह्या अपमृत्यूची जबाबदारी सर्व ऋषींनीं रामचंद्राचे माथीं मारली, हें महाराजांस विदितच आहे.—अनाथांकडून बलात्कार मुकाट्यानें सोसला जातो किंवा हताश होऊन दुबळी प्रजा दुःखांतच दिवस काढीत गप्प बसते, असें पाहून जर राजे लोक आपल्या कर्तव्यास जागेनासे झाले, तर त्यांच्या सिंहासनाच्या खालचा धर्माचा पाया त्यांना न कळत खचत जाऊन बोलतां बोलतां सिंहासन तिरपागडें झाल्यावांचून रहात नाहीं. म्हणून महाराजांपाशीं माझी विनंति आहे कीं, दासींच्याहि मनाची प्रवृत्ति पातिव्रत्यभंगाकडे न होईल अशी खबरदारी घेणें, हें सरकारचें पवित्र कर्तव्य आहे. प्रजेनें कितीहि मुकाट्यानें जुलूम सोसला तरी परमेश्वराचे दरबारांत त्या जुलमाच्या प्रायश्चित्तापासून राज्यकर्त्यांची सुटका होणें शक्य नाहीं.

विरा०—कंकभटजी, हा धर्म मला कळतो पण प्रत्यक्ष व्यवहारांत वळत नाहीं.—धर्मबुद्धि बरोबरच स्वार्थबुद्धि मनुष्यांत उत्पन्न झालेली असल्यामुळें, आणि मी राजा झालों तरी मनुष्यच असल्यामुळें, सैरंध्री मुकाट्यानें बलात्कारास बळी पडली तर कीचकमहाराजांच्या हौसेकडे मी डोळेझांक केल्यावांचून राहणार नाहीं. पण आज दोनप्रहरीं आमच्या वसंतबागेंत कीचकमहाराजांनीं ज्याप्रमाणें सैरंध्रीच्या निरीस हात घातला—[ पडद्यांत—"पाप्या, चांडाळा, खबरदार माझा पदर धरलास तर—विराट महाराजांच्या दरबारांत माझी लाज—कोण संभाळतो पाहूं दे." ]

विरा०—हा कोणाचा शब्द !

[ कीचकानें सैरंध्रीचा पदर धरलेला आहे असे 'सैरंध्री व कीचक' प्रवेश करतात. ]

सैरं०—धर्मावतार विराट महाराज, ह्या गाईच्या लाजेचें ह्या दुष्ट लांडग्यापासून संरक्षण करा.

कीच०—ह्या बटकीची लाज कोण संभाळतो तें पाहूं दे.

विरा०—माझ्या दरबारांत—माझ्या समक्ष—असलें वर्तन—मी नाहीं चालूं देणार.

गुरु व पुरो०—(मिळून) काय हें राक्षसी कृत्य!

सुदे व रत्न०—(मिळून) असलें पशुतुल्य पापाचरण!

कीच०—[सैरंध्री व कीचक ह्यांच्यामध्यें ओढाताण चालली असतां]—ह्या माझ्या कृत्याला पशुतुल्य पापाचरण म्हणा, राक्षसी कृत्य म्हणा, किंवा राजा विराट, तुझ्या डोळ्यादेखत झालेला हा तुझा अपमान समज. हा कीचक,—ह्या दरबारांत,—राजा, गुरु, पुरोहित व महाराणी ह्या सर्वांचे डोळे उघडे असतांना—ह्या सायंकाळचे वेळीं—सूर्य अस्तास जाण्यापूर्वी दिवसा सृष्टीचें नियमन करणाऱ्या देवता शेवटची नजर पृथ्वीवर फेंकीत असतांना त्यांच्या-समोर—रात्रीच्या देवता उदयोन्मुख होऊन सृष्टीचा ताबा घेण्याकरितां पृथ्वीवर प्रारंभींची नजर फेंकीत असतांना त्यांच्याहि डोळ्यांदेखत—हा कीचक—ह्या दरबारांत—ह्या सैरंध्रीचा पदर तिच्या अंगावरून जबरदस्तीनें ओढून काढून—आजच्या रात्रीं ही सैरंध्री खात्रीनें माझी रंडी होणार, हें तिच्या अनुभवास आणून देणार.

सैरं०—दुष्टा, चांडाळा, पतिव्रतेचें सामर्थ्य किती असतें हें तुझ्या अनुभवास येण्याची वेळ आतांच आलीसें मला वाटतें—

कीच०—पांच नवऱ्यांची बायको द्रौपदी—तिची तूं दासी! ह्या बाजार-बसवी सैरंध्रीला पातिव्रत्याची घमेंड कशाला पाहिजे!

सैरं०—विराटमहाराज, ह्या गाईचें ह्या राक्षसापासून आपण संरक्षण केलें पाहिजे, नाहीं तर—

कीच०—काय, नाहीं तर काय—महाराज, आपण स्वस्थ बसावें—हिच्या ह्या पातिव्रत्याच्या ढंगाचा मला चमत्कारच बघावयाचा आहे.—नाहीं तर काय?—बोल.

कंक०—कीचकमहाराज, सीता, मंदोदरी, सावित्री, ह्या पतिव्रतांचीं उदाहरणें आठवून—



कीच०—सैरंध्रीचा पदर तिच्या अंगावरून जबरदस्तीनें ओढून काढून-आजच्या रात्रीं ही सैरंध्री खात्रीनें माझी रंडी होणार, हें तिच्या अनुभवास आणून देणार. [ पृ. ७८

कीच०—अरे, जा, अशा पुष्कळ पतिव्रतांचीं नांवें मला माहीत आहेत. 'सुदेष्णा, रत्नप्रभा, मंदोदरी, सावित्री आणि सीता, ह्या पांच कन्यांत आमचें हें रांडरू पातिव्रता!'—अशी भीति दाखविणारांना भीक घालणारा हा कीचक नव्हे.—सैरंध्री, जगाच्या आरंभापासून आतांपर्यंत झालेल्या सर्व पतिव्रतांचें स्मरण कर, जगाच्या अंतापर्यंत पुढें होणाऱ्या सर्व पतिव्रतांच्या सामर्थ्यालाहि तुझ्या मदतीला बोलाव—पूर्वीच्या व पुढच्या सर्व पातिव्रतांच्या पुण्याईला पाया-खालीं तुडवून तुला भ्रष्ट करण्यास हा कीचक समर्थ आहे, असें—तुला हा तुझा पदर—असा ओढून—

[ "हें काय, हें काय" असें म्हणत सर्व पुरुष कीचकाचे सभोंवतीं व "हिला सोडून देण्याची भीक आह्मांला घाला" असें म्हणून बायका सैरंध्रीच्या भोंवती रडत राहतात. "सैरंध्रीची लाज रक्षण करणारे यक्ष किन्नरहो, धांवा, धांवा ह्या राक्षसापासून मला सोडवा." असें सैरंध्री ओरडत राहते. ]

कीच०—येऊं देत, यक्ष किन्नर म्हणवून घेणारे तुझे कोण कोण जार तुझ्या मदतीला यावयाचे असतील, ते येऊं देत.-दिवसा तुला नग्न पाहण्याची तुझ्या जारांची हौस जर आजपर्यंत कोणी पुरविली नसेल, तर कीचकाचा हा डावा हात त्यांचे डोळ्यांचें पारणें फेडल्यावांचून आतां राहणार नाहीं.

सैरं०—(कीचकाचे हाताला हिसका देऊन) राजा विराट, ह्या चांडाळाचा बंदोबस्त जर ह्याक्षणीं तुझ्या हातून झाला नाहीं तर माझें रक्षण करणारे यक्ष ह्या ठिकाणीं प्रगट होतील आणि तुझें हें पुरातन सिंहासन कीचकाच्या रक्तानें माखलें जाईल.

कंक०—राजा, सर्वांचा संहार न व्हावा असें जर तुझ्या मनांत असेल तर ह्या कीचकाला आवरून धर.—अधर्म अखेरीस सर्वांचीं पाळेंमुळें खणून काढल्याशिवाय रहाणार नाहीं.

(वरील चौकोनी कौंसांतील भाषणें वगैरे पुन्हां एकवार)

कीच०—या, सैरंध्रीच्या मदतीला धांवणारे यक्ष—किन्नर कोण येणार असाल ते लवकर या.

**रत्न०**—[कीचकाजवळ गुडघे टेंकून व कीचकाचे पाय धरून] महाराज, सर्व कुळाचा संहार करणारें हें अमानुष्य कृत्य.—ह्या आपल्या विवाहित स्त्रीकडे पाहून तरी,—आपण करूं नका. महाराज, पूर्वीच्या पतिव्रतांच्या बद्दल आपल्या मनांत जरी आदर नसला, भावी पतिव्रतांबद्दल आपल्या मनांत पूज्यबुद्धि नसली, तरी ह्या गरीब दासीच्या—रत्नप्रभेच्या- आपणावरील निस्सीम प्रेमाविषयीं आपल्या थोर मनांत बिलकूल संशय नसून माझ्याविषयीं आपल्या मनांत निदान तिरस्कार नाहीं.—महाराज, आपण मजबरोबर प्रेमानें जो काळ घालविला असेल त्याची आठवण करा, ह्या गरीब दासीच्या हातून जी आपली सेवा-चाकरी झाली असेल त्याचें स्मरण करा, आणि आपल्या ह्या अर्धांगीच्या पातिव्रत्याबद्दल मला भीक घाला कीं कोणाच्याहि स्त्रीची अशा रीतीनें अब्रू घेण्य स—

**कीच०**—जा, सैरंध्री जा, ह्या क्षणापुरतें तुला सोडून दिलें आहे.—ऊठ, रत्नप्रभे ऊठ,—सवतीमत्सरानें तूं आपला डाव ह्या वेळीं जरी साधलास, तरी—ऊठ—ऊठ—

**रत्न०**—नाहीं, महाराज, नाहीं; सैरंध्रीच्या वाटेस आपण कधींहि जाणार नाहीं, असें मला आश्वासन मिळाल्याशिवाय मी उठणार नाहीं.

**कीच०**—रत्नप्रभे, तुला कितीदां सांगितलें आहे, ह्या कामीं सवती-मत्सराचें कांहीं कारण नाहीं.—हा प्रश्न माझ्या इज्जतीचा आहे. माझी इज्जत राखण्यासाठीं—माझा शब्द खरा करण्यासाठीं मी काय पाहिजे तें करीन.—ऊठ, मुकाट्यानें ऊठ,—आज रात्रीं ही सैरंध्री माझी नाटकशाळा झालीच पाहिजे.

**रत्न०**—महाराज, हा हट्ट सोडून द्या.

**कीच०**—ऊठ, मुकाट्यानें ऊठ.—नाहीं !—नाहीं !—नाहीं !—सैरंध्री, पूर्वीच्याहि पतिव्रता तुझें रक्षण करणार नाहींत, पुढच्याहि पतिव्रता तुझें रक्षण करणार नाहींत, व सांप्रतच्याहि पतिव्रता तुझें रक्षण करणार नाहींत.—माझ्या पायांत अडकलेली ही लग्नाची बिडी अशी ताडकन् तोडून सैरंध्रीला ओढण्याची ह्या कीचकाच्या अंगांत शक्ति आहे.

[ रत्नप्रभेला लाथाडून सैरंध्रीला धरावयास जातो. 'काय हा अविचार, काय हा अविचार, असें म्हणत पुरुष आडवे येतात. सुदेष्णा रत्नप्रभेला

उठविते, रत्नप्रभा व सुदेष्णा दोघी मिळून 'महाराज नकाहो हें पाप करूं' असें म्हणत रहातात. ]

सैरं०—( सिंहासनाच्या मागें उभी राहून ) विराट महाराज, आपल्या सिंहासनाचा आसरा घेऊन मी आपणास शरण आलें आहें.—आपल्या सिंहासनाची जी अब्रू तीच माझी अब्रू आहे. दोन्ही अब्रूंचें रक्षण करण्यास आपण समर्थ आहां.

कीच०—राजा विराट, माझा आपणाला एकच सवाल आहे.—मी आपणास पाहिजे असेन तर ह्या सैरंध्रीला माझ्या ताब्यांत आतांच्या आतां दिली पाहिजे. जर ह्या क्षणीं सैरंध्रीला आपण माझ्या स्वाधीन केली नाहीं तर आपणांस मी नको आहें असें मानून, सर्व अनुकीचक गोळा करून, आजच्या रात्रीचा अर्धा भाग—राजा विराट—तुझ्या सिंहासनाचा भंग करण्यांत खर्च करीन, व दुसऱ्या अर्ध्या भागांत ह्या सैरंध्रीच्या पातिव्रत्याचा भंग होईल.—राजा विराट, माझ्या बाहुबलानें स्थिर झालेलें हें तुझें सिंहासन उलथून पाडण्यास मला एक क्षणहि लागणार नाहीं, हें तुला माहीत आहेच.—राजा तुझ्या तोंडून निघणाऱ्या शब्दाची मी वाट पाहत आहें.

सैरं०—महाराज, नीट विचार करून काय द्यावयाचें तें उत्तर द्या.—ह्या चांडाळाच्या हवालीं मला केल्यानें त्याच्या शरीराबरोबरच ह्याहि सिंहासनाचे तुकडे होतील, हें पक्कें लक्षांत ठेवा.—माझे पाठीराखे यक्षकिन्नर, कीचक व अनुकीचक ह्यांचाच केवळ समाचार घेऊन राहणार नाहींत, तर ह्या पापी कृत्याला जे जे संमति देतील त्यांचाहि संहार ते करतील.

विरा०—गुरु महाराज, पुरोहित महाराज, ह्या बिकट प्रसंगीं मी राजा धृतराष्ट्राचें अनुकरण करणार.

गुरु व पुरो०—ह्या प्रसंगीं तसेंच करणें योग्य.

विरा०—कीचक महाराज, पांडव वनवासाला जाण्यापूर्वी द्रौपदीवस्त्रहरणाचे वेळीं राजा धृतराष्ट्रानें जे हुकूम केले, तेच हुकूम मी आतां करीत आहें; व ते आपण सर्वांनीं मानलेच पाहिजेत.

कीच०—राजा, तुझे हुकूम जर योग्य असतील तर ते मी अल्बत मान्य करीन.

विरा०—भरदरबारांत द्रौपदीचें वस्त्रहरण करण्याची. धृतराष्ट्रानें मनाई केली, त्याप्रमाणें ह्या सैरंध्रीचें वस्त्रहरण करण्याची आम्ही तुम्हांस मनाई करीत आहों.—सुयोधन जसा धृतराष्ट्राला प्रिय त्याप्रमाणेंच आपणहि आह्माला फार प्रिय असून। आमच्या डोळ्यांदेखत आपल्या हातून पापाचरण घडावें अशी आमची इच्छा नाहीं. तथापि एकाद्या दासीकरितां आपण व आम्ही वैरी व्हावें हें इष्ट नसल्यामुळे आतांच्या आतां आम्ही ह्या सैरंध्रीला शहराबाहेर वनवासास पाठवून देतों.—आमचे दूत आतां हिला देवीवनांतील भैरवाचे देवालयांत सोडून येतील.—सैरंध्री, ह्या दरबारांत मी तुझी अब्रू राखिली आहे. तुझ्यासारख्या एकाद्या दासीसाठीं कीचकमहाराजांचा मी शत्रू होणें राजकाजास विघातक असल्यामुळें वनवासांत मजवर विसंबून न रहातां तूं आपल्या यक्ष-किन्नरांचा धांवा कर.

[ पडदा पडतो ]

अंक चवथा समाप्त



# अंक पांचवा.



## प्रवेश पहिला.



स्थळ—जंगल. कंकभट व बल्लभ प्रवेश करितात.

कंक०—भीमा, नाइलाज होऊन कीचकवधाला मी संमति देतों खरा—परंतु—

बल्ल०—परंतु काय?—दादा, मला वाटतें, मी आणखी घटका दोन घटकांनीं कीचकाला मारुन परत आल्यावरहि तुमचें परंतु शिल्लक राहील.—दादा, कीचकाला गुपचिप मारण्याची आयती संधि मिळाल्यानें मला कसा आनंद होतो आहे; आणि तुम्ही आपले उद्विग्न आणि खिन्न!

कंक०—असें आहे खरें.—काय होईल—कसें होईल—आमच्या हातून कांहीं पातक होतें आहे किंवा काय—ज्ञानवृद्ध ऋषींनीं आंखून ठेवलेल्या पुण्य मार्गापासून आम्हीं दूर दूर जातो आहों किंवा कसें—असे विचार मनांत येत चालले म्हणजे मन अधिक अधिक उदास होत जातें; आणि जगांतील ह्या उलाढालींचा कंटाळा येऊन द्यूतातील पैजेमध्यें जन्मभर अरण्यवास माझ्या कपाळीं सुयोधनानें कां मारला नाहीं, असें मला वाटूं लागतें!

बल्ल०—अरण्यांत जन्म काढून, पृथ्वीला दुर्योधनाच्या दुष्ट बुद्धीच्या ताब्यांत देण्याचा पापी व भित्रा हेका जर महाराजांना चालवावयाचा असेल, तर कीचकाला गुप्तपणानें तरी कशाला मारायला पाहिजे? भर दिवसा चवाठ्यावर कीचकाला मी मारतों, मग आपण सर्वजण प्रगट होऊं आणि जाऊं वनवासाला.

कंक०—भीमा, अविचारानें आणि आडदांडपणानें फजीत व पराभूत होऊन वनाकडे जाण्याची माझी इच्छा नाहीं. वनवासांत असतांना जी धर्मबुद्धि आम्हां पांडवात जागृत होती, त्याच धर्मबुद्धीचें वळण संसारांतील

लोकांना लावण्याची संधि मिळावी म्हणून इंद्रप्रस्थाचे सिंहासनावर पुन्हा बसण्याची माझी इच्छा आहे.-ही पांडवांची सात्विक महत्त्वाकांक्षा एकाच व्रताच्या साधनानें पुरी होणारी आहे.

बल्ल०—कोणचें तें व्रत?

कंक०—लोभाला किंवा क्रोधाला बळी पडून अधर्म करण्यास प्रवृत्त न होणें.

बल्ल०—दरबारांतला सायंकाळचा प्रकार पाहिल्यावरहि कीचकवध हा अधर्म आहे, असें महाराज, आपल्याला वाटतें काय?-रत्नप्रभेच्या विनंतीनें सुदेष्णेच्या सांगण्यानें, किंवा विराटाच्या भीतीनें कीचक ताळ्यावर येईल, असें महाराज, आपल्याला अद्याप वाटतें तरी कसें?-कीचक विराटाला भितो, का विराट कीचकाला भितो, ह्याविषयीं दादा, आपले मनांत अद्याप शंका आहे काय?

कंक०—केवळ कीचकाकडे पाहिलें म्हणजे कीचकवधांत अधर्म होत आहेसें मला वाटत नाहीं; पण—

बल्ल०—पुन्हां पण?-पण-पण-पण—

कंक०—पण भीमा, असें आहे, आपण आज कित्येक महिने राजा विराटाच्या आश्रयानें राहिलों आहों. तेव्हां कीचकवधामुळें राजा विराटाच्या ह्या मत्स्यदेशाची शक्ति लंगडी झाल्यानें राजा विराटाचें मन उदास नाहीं का व्हावयाचें?

बल्ल०—दादा, ज्या आमच्या शक्तीनें कीचक मारला जाईल, तीच शक्ति पुढें विराट राजाचे उपयोगी नाहीं का पडावयाची?-दादा मला माहीत आहे, कीचकाचा वध मी आज रात्रीं केल्यावर त्रिगर्तांना मत्स्यदेशाचें भय रहाणार नाहीं. मग त्रिगर्त आणि कौरव एक होऊन मत्स्यदेशावर स्वारी करतील. पण दादा, त्या वेळीं आम्ही पांडवच त्रिगर्तांना व कौरवांना मागें परतवून लावूं! असें झाल्यावर कीचकवधाची आठवण विसरून राजा विराट पांडवांवर पूर्ण प्रेम नाहींका करूं लागणार?

कंक०—असें होईल खरें; पण भीमा, कीचकाला न मारतांहि राजा विराटाचे प्रेमास जर पांडव पात्र झाले, तर अधिक चांगलें होईल.—भीमा, कीचक कर्ता असून अत्यंत उन्मत्त आहे, आणि अशा पुरुषांना मऊ पाडण्याचा एकच उपाय आहे. त्यांच्याहून श्रेष्ठ अशी शक्ति त्यांना दाखविली म्हणजे—ते मूळचे धर्मभीरु असल्यास—आपोआप सन्मार्गाला लागतात. भीमा, तुझी प्रचंड शक्ति कीचकाला दाखीव आणि नंतर पांडवांचा पक्षाभिमानी होण्याबद्दल त्याला विनंति कर.

बल्ल०—तें सर्व मी करतो.—दादा, आतां मला जाऊं द्या. ह्या वाटाघाटींनें भैरवाच्या मंदिरांत पोहोंचण्यास मला उशीर होईल.

कंक०—जा, लवकर जा.—सर्व देवता ह्या वेळीं तुला आपलें बळ देवोत. पण—भीमा, ह्या बळाचा उपयोग कीचक शेवटीं ताळयावर येत असतां त्याला मुद्दाम म्हणून मारण्याकडे करूं नको.

बल्ल०—नाहीं दादा, तसा अधर्म माझ्या हातून होणार नाहीं.

[ जातो. ]

कंक०—परमेश्वरा, कीचकाला मल्लयुद्धांत पराभूत करून प्राणघात करण्याच्या इराद्यानें भीम कीचकाच्या उरावर बसला असतां, मानापमानाच्या खोट्या कल्पनेचा पगडा कीचकाच्या मनावर बसूं देऊं नको, व कीचक अखेरीस पांडवांचा पक्षपाती होऊन विराट नगरींतील पांडवांचा अज्ञातवास पांडवांना शांतिदायक व विराट राजाला कीर्तिदायक कर. [ जातो. ]

---

## प्रवेश २ रा.

स्थळ—कीचकाचे महालापुढील पटांगण. कीचक, चंचला व चपला प्रवेश करितात.

कीच०—चपले, हें माझें धनुष्य आंत नेऊन ठेव, हा भाताहि घे.

चप०—मग काय महाराज, गदा आणून देऊं का?

**कीच०**—नको, गदेची जरुर नाहीं. जा, आणि असें पहा, हा महाशंखहि नको. हाहि नेऊन ठेव.

**चप०**—महाराज, शस्त्रास्त्रेंहि बरोबर नेणार नाहीं, तर कवच-कुंडलें तरी आणून देऊं का ?

**कीच०**—नको, कांहीं नको, जा तूं. [ चपला धनुष्यबाण घेऊन जाते ] चंचले, हे खड्ग नेऊन ठेव. हेंहि बरोबर मला नको.—हें पहा, सारथ्यानें रथ कां अद्याप आणला नाहीं, त्याची चौकशी कर. मी ह्या पटांगणांत केव्हांचा उभा आहे.—खड्ग नेऊन ठेव आणि रथाची चौकशी कर. [चंचला जाऊं लागते] ए चंचले, इकडे ये, सैरंध्रीला देवीवनांत पोंहोंचविल्याबद्दल वर्दी आली कीं नाहीं, त्याचा अगोदर पहारेकऱ्यापाशीं तपास कर.

**चंच०**—हें काय महाराज, सरकार महालांत असतांनाच सैरंध्रीला वनांत पोंचविल्याबद्दल पहारेकऱ्यांनी वर्दी दिली, आणि नंतरच महाराजांनीं सारथ्याला रथ सिद्ध करावयास हुकूम केला !

**कीच०**—हो मी विसरून गेलों ! देवीवनांत भैरवाच्या देवालयांत सैरंध्रीला केव्हां प्रेमालिंगन देईन असें मला होऊन गेल्यामुळें आठवण राहिली नाहीं.—जा खड्ग ठेवून रथाची चवकशी कर. [ चंचला जाऊं लागते. ] चंचले, जरा परत ये.—हें पहा, पलंगावर माझ्याकरितां आणि तुझ्या यजमानणीकरितां गुंफलेले हार ठेवलेले असतील ते घेऊन ये.

**चंच०**—आज्ञा महाराज. [ जाऊं लागून व पुन्हा परतून ] पण महाराज, इतक्यांत तेथें जर महाराणीसाहेब आल्या, आणि हारांना हात लावूं नको म्हणून त्यांनीं ताकीद दिली, तर मी काय करूं ?

**कीच**—चंचले, तुझा स्वभावच रडका !—असें झालें-तसें झालें—तर मी काय करूं ! रडत बैस. रिकामी भीति मनांत आणायची, आणि दुःख करीत बसायचें ! जा, मुकाट्यानें हार घेऊन ये. [ चंचला जाते. ] सैरंध्रीला भेटायला निघतांना उगीच वेड्यासारखा शस्त्रास्त्रें घेऊन निघालों होतों. सैरंध्रीसारख्या मानी बायकांचा एकांतांत एकदां हात धरला म्हणजे माझ्यासारख्या

प्रतापी पुरुषांशीं तिला फुलांच्या हारांनीं गच्च बांधून टाकलें पाहिजे. ( चंचला परत येते. ) कां, अर्ध्या वाटेंतूनच परत आलीस ! मोटी अपशकुनी ! केव्हां कोणतें काम सांगितलें, आणि वांकडें तोंड न करतां–आढेवेढे घेतल्याशिवाय–ह्या रडक्या पोरीनें तें केलें, असें व्हायचेंच नाहीं!–काय रडूबाई, आतां कोणचें रडें रडणार? सांगा, हं सांगा.

चंच०—महाराज, माझ्या मनांत मघाशीं उगीच नाहीं शंका आली. त्या पहा रत्नप्रभा राणीसाहेब इकडेच येताहेत. मग मी हार कसे घेऊन येऊं?

कीच०—रडकी ती रडकी.–तुझ्यांत उत्साह म्हणून वसा तो नाहींच.–चंचले ती जर इकडे आली, तर तुझें बरेंच झालें. पलंगाजवळ जा आणि हार परस्पर रथांत नेऊन टाक.–जा आतां तोंड नको वांकडें—

चंच०—पण आतां महाराजांना, महाराणीसाहेब बाहेर तरी जाऊं देतील का?

कीच०—तुला कोणी ही उठाठेव सांगितली? जा–एकदम जा.—मोठी अपशकुनी बोवा! [ चंचला जाते व रत्नप्रभा येते. ] महाराणीसाहेब, रात्रीं अपरात्रीं, महालांतून बाहेर पडण्याची ह्या कोमल चरणकमलांना तसदी देण्याची कां खुशी झाली?–विनंति केल्याची कसूर दयालु अंतःकरणानें माफ करुन, हुकूम काय आहे तो सांगण्याची सरकारनीं मेहेरबानी करावी; दास सेवेला तत्पर आहे.

रत्न०—महाराज, ह्या आपल्या गरीब दासीला आपण कितीहि झिडकारुन दूर केलें–कुठें, कसें, लाथाडलेंत–तरी आपणांवरील निष्कपट प्रेमामुळें–रात्र अपरात्र न पहातां–ही दासी वारंवार ह्या पायापाशीं विनति करणारच.

कीच०—(गुडघे टेंकून) सुंदरी, लाडके, मला आज्ञा करण्यापूर्वी एक प्रहर दीड प्रहराची मला पुरसत दे. (उठून) एवढ्या अवधींत तुझ्या पायांवर लोटांगणें घालण्याकरितां सैरंध्रीला घेऊन येतों.

रत्न०—महाराज, आपल्या मनाला दुःख होईल, तेव्हां आपण जें कृत्य करण्यास निघालां आहां तें वाईट आहे, असें मी कसें म्हणूं? महाराजांना

नांवें ठेवण्याची माझी योग्यता नाहीं. पण महाराज, (कीचकाचे अंगावर पडून) आपले वाडवडील मोठे सद्‌गुणी, पापभीरु, व धर्मनिष्ठ होते, अशी ह्या मत्स्यदेशांत आपल्या घराण्याची ख्याती आहे. त्या पुण्यश्लोक पूर्वजांच्या कीर्तीची महाराजांना ह्या वेळी ह्या दासीनें आठवण करून दिली, तर महाराजांच्या जीवाला कष्ट होणार नाहींत ना?—खुद्द प्राणनाथांचे आजपर्यंतचें चरित्र किती तरी बाई शुद्ध आहे!—महाराज, ती पापी प्रतिज्ञा पुरी करण्याचा हट्ट धरून कीचकानुकीचकांच्या कुलांना कलंक लावून आपला व आपल्या घराण्याचा नाश करायला प्रवृत्त होऊं नका.

कीच०—(स्वतःस सोडवून घेऊन तिला दूर सारून) रत्नप्रभे, तुझ्या नवऱ्याच्या मनांत मानापमानाचे—इज्जतबेइज्जतचे—कोणचे विचार घोळत असतात, याची तुला कल्पनाहि नसावी, हें माझें दुर्दैव होय.—बायका नुसत्या सुंदर, प्रेमळ, आणि विवेकी असून भागत नाहीं. नवऱ्याच्या मानानें नवऱ्याचा मानापमान समजण्याची त्यांच्या अंगीं जर बुद्धिमत्ता नसेल तर, प्रतापी व महत्वाकांक्षी पुरुषांचा संसार असल्या बायकांच्या सहवासानें दुःखमय होतो; हा विद्वानांचा सिद्धांत, रत्नप्रभे, तूं आपल्या वर्तनानें ह्या वेळीं खरा करून दाखवीत आहेस.

रत्न०—महाराज मी बुद्धिहीन तर खरीच, पण पदरीं पडून पवित्र झालें आहें, म्हणून या पायांपाशीं विनंति करतें. कैलास पर्वताला बाहुबलानें डोलायला लावणारा—आणि स्वतःच्या सामर्थ्यानें तेहतीस कोटी देवांना बंदींत टाकून घरचीं झाडलोटीचीं कामें सर्व देवांना करायला लावणारा—चौदा चौकड्यांचा राजा रावण स्वतःच्या प्रतापासंबंधाच्या—मानापमानासंबंधाच्या—इज्जतबेइज्जतसंबंधाच्या—चुकीच्या कल्पनेला बळी पडला.—त्याच्या दृष्टीनें क्षुल्लक दिसणाऱ्या मानवस्त्रीला त्यानें पळवून नेली. मंदोदरीपेक्षां सीता त्याला विशेष सुंदर दिसत होती असें नाहीं; आणि त्या महासाध्वी मंदोदरीवरचें त्याचें प्रेम सीतेला लंकेंत नेली म्हणून कमीहि झालें नव्हतें. पण सीतेला सोडून दिल्यानें आपला लौकिक जातो एवढ्याच हट्टानें रामाशीं युद्ध करण्याकरितां रावण बाहेर पडला.—महाराज मी अज्ञानी आहें; या पायांपाशीं विनंति



रत्न ७—युद्धाला निघण्यापूर्वी सीतेला सोडून देण्याविषयी मंदोदरीनं रावणाला केलेली शेवटची विनंति रामकथेत आतांच मी नुकती महालांत वाचीत होतें....तेवढी पोथी आणते आणि महाराजांना मंदोदरीची विनंति वाचून दाखवितें. [ पृ. ८९

कशी करावी हें समजण्याइतकी मला बुद्धि नाहीं. तथापि आपल्यावरील निष्कपट प्रेमामुळें विनंति करण्याचें धाडस करतें. युद्धाला निघण्यापूर्वी सीतेला सोडून देण्याविषयीं मंदोदरीनें रावणाला केलेली शेवटची विनंति रामकथेंत आतांच मी नुकती महालांत वाचीत होतें. येथें थोडा वेळ उभें रहावयाचें होतें. तेवढी पोथी आणतें आणि महाराजांना मंदोदरीची विनंति वाचून दाखवितें. इकडून जर ती विनंति ऐकण्याचें झालें, तर इकडचें मन बदलल्याशिवाय रहाणार नाहीं, अशी माझी खात्री आहे.

कीच०—जा; तुझीं पोथ्या पुस्तकें असतील नसतील तीं सर्व घेऊन ये. सगळ्या पोथ्या चाळून तुझी खात्री करून देतों कीं, हा कीचक सवाई रावण असून त्या सैरंध्रीला सीतेच्या पायाच्या धुळीचीहि योग्यता नाहीं जा, सगळ्या पोथ्या घेऊन ये, एकहि पोथी मागें ठेवूं नकोस, ह्मणजे एकदाची माझ्या मागची ही पोथ्यापुस्तकांची पिरपिर कायमची तरी सुटेल! (रत्नप्रभा जाते) वेडे रत्नप्रभे, एकदां हा शब्द तर एकदां तो शब्द अशा रीतीनें क्षणाक्षणाला आपलें वचन बदलणाऱ्या आणि बोलण्यांत बोलणें नाहीं असें बदनाम झाल्यामुळें दुतोंड्या इतकेंच नव्हे तर दहा तोंड्या म्हणून लोकांनीं नांव ठेविलेल्या रावणावरहि मंदोदरीच्या ज्या उपदेशाचा कांहीं परिणाम झाला नाहीं, त्याच उपदेशानें ह्या एकवचनी कीचकाचा शब्द फिरेल असें तुला वाटतें तरी कसें? वेडगळ खरी वेडगळ!—आकाशांतून मनुष्याकडे पाहून मानवदोषांची आपआपसांत निंदा करण्याकरितां देवता नेहमींच डोळे मिचकावीत असतात; आणि आतां तर, रत्नप्रभे, आकाशांत चमकणारे हे तारे—देवतांचे हे डोळे—तुझा वेडगळपणा पाहून देवता फारच निर्भर्त्सना करीत आहेत हें दाखविण्याकरितां विशेषच लिकलिकूं लागले आहेत. [चंचला येते]

चंच०—सरकार, हार रथांत नेऊन ठेवले असून सारथ्यानें रथ तयार केला आहे.

कीच०—चंचले, मघाशीं तूं माझ्या कामाला अपशकून केला होतास, पण ह्या वेळीं तूं रत्नप्रभेला अपशकून केलास म्हणून तुला हें बक्षिस घे.

[ कंठा देतो ] तुझी यजमानीण महालांतून येथें परत येण्यापूर्वीच मी येथून चालता होणार. ती येथें आल्यावर तिला सांग, कीं तिनें आणलेल्या पोथ्या पुस्तकांतून तिच्या विरुद्ध निरनिराळीं वचनें तिला दाखवून तशा रीतीनें तिची समजूत घालीत बसण्यापेक्षां प्रहरा दीड प्रहरांत प्रत्यक्ष कृतीनेंच तिची मी खात्री करून देणार असल्यामुळें देवीवनांत सैरंध्रीचें हरण करण्याकरितां मी निघून गेलों,—चल मला रथाकडे घेऊन चल.

चंच०—असें,—असें—यावें महाराज.

[ जातात ]

---

## प्रवेश ३ रा.

स्थळ—देवीवनांतील भैरवाचें देवालय. सैरंध्री मूर्च्छित पडली आहे.

सैरं०—[ शुद्धीवर येऊन ] गेले वाटतें सर्व चांडाळ, मला एकटीला येथें टाकून निघून गेले!—मी किती वेळ मूर्च्छित होतें बरें?—या देवळांत भैरवाशिवाय दुसरें कोणी नाहींना?—द्रौपदी काय ही तुझी स्थिति! त्या दुष्ट दुःशासनानें भर दरबारांत माझी अब्रू घेण्याचा प्रयत्न केला, आणि दैवी चमत्कारानंतर शुद्धीवर येऊन धृतराष्ट्र मामंजींनीं मला वनवासाला धाडून दिलें, त्या वेळीं पांडवांची ही भार्या वनांत एकटी तरी नव्हती.—आज माझा पदर ओढणाऱ्या कीचकाला दरबारांत विराट महाराजांनीं थांबवून धरलें खरें, पण डोळ्यांवर कातडें ओढून, मला एकटीला वनवासांत पाठवून, कीचकाला मी बळी पडावें अशी व्यवस्था त्यांनी केली!- जरासंध, बकासुर, किर्मिर वगैरे दैत्यांना मारणारे भीम महाराज माझें रक्षण करण्यास वनांत यावयास चुकणार नाहींत, या आशेनें विराटाचे दूत मला वनांत आणीत असतां मी हंबरडा फोडला नाहीं.- पण आतां वनांत—हा कोणाच्या पावलांचा आवाज दुमदुमत आहे—चाहूल जवळ येत चालल्यासारखी दिसते- तो—चांडाळ—कीचक तर येत नसेलना! [ उठून ऐकल्यासारखें करून ] हा त्या चांडाळाच्या पावलांचा

आवाजच नव्हे !--ह्या आवाजावरून--चालतांना प्रत्येक पावलासरशीं पृथ्वीला वांकायला लावणारे -वीररसाची प्रत्यक्ष मूर्ति--माझे प्राणनाथ--पुन्हा आवाज जरा पलीकडे गेला !--वाट चुकून दुसरीकडेच जातील--मोठ्यानें हांका मारल्या पाहिजेत.--विश्वांतील सर्व मल्लांमध्यें श्रेष्ठ, गदाधरांचे अग्रणी, शौर्याचे प्रवर्तक--रणभूमीवरील प्रत्यक्ष भैरव--माझे प्राणनाथ--

[ गळ्यांत हार घातलेला कीचक प्रवेश करितो. ]

**कीच०**--[ हार पुढें करून ] हा प्रेमाचा हार घालण्याकरितां--

**सैरं०**--[ हार फेंकून देऊन ] राक्षसा, इतका वेळ ज्या ठिकाणीं लपून होतास त्याच ठिकाणीं जाऊन बैस.--काय ? तुला ह्या पावलांचा आवाज ऐकूं येत नाहीं ?--तुझ्यासारख्या हलकट पाप्यांचा संहार करण्याकरितां अवतरलेले माझे प्राणनाथ --

**कीच०**--आतां ह्या वीराशिवाय दुसरा कोण तुझा प्राणनाथ आहे ?--बायाबापड्यांच्या देखत यक्षकिन्नरांच्या गोष्टी सांगून सुदेष्णेला आणि रत्नप्रभेला भीति घातलीस, त्या वेळीं तुझी युक्ती साधली. पण आतां ह्या भैरवाला साक्षी ठेवून-साक्षी काय करावयाचा-हा भैरव म्हणजे माझा बिछाना साफ करणारा पानदानावरील माझा हुजऱ्या आहे असें समजून--

**सैरं०**--दुष्टा, देवांची अशी निर्भर्त्सना करतोस ?

**कीच०**--माझ्याशिवाय ह्या विश्वांत दुसरा कोणीहि श्रेष्ठ नाहीं. मी प्रथम आणि मग देवबिव सर्व मागाहून.- सैरंध्री, देवांचा देव मी आहें.--राजांचा राजा मी आहें.--जगांतील सर्व सुंदर तरुणींचा भोक्ता मी आहें- असें मानून माझ्या गळ्यांतला हा हार तुझ्या गळ्यांत घालण्यास मला परवानगी--

[ हार गळ्यांतून काढून तिच्या गळ्यांत घालूं लागतो. ]

**सैरं०**--[ हाराला झिटकारून ] दूर हो, चांडाळा, तुझी वेळ भरत आली.--मृत्यूच्या मुखांत आपण होऊन पडूं नकोस.

**कीच०**--[ तिचा हात धरून ] हा हट्ट आतां पुरे-तुझी इच्छा असो वा नसो, तुला येथून उचलून नेऊन रथांत घालून माझ्या मंदिरांत आतांचे आतां नेऊन ठेवतों. [ ओढूं लागतो. ]

**सैरं०**—प्राणनाथ, धांवा, धांवा, हा चांडाळ कीचक-ह्या द्रौपदीची अब्रू— [स्वतःस सोडवून घेते.]

**कीच०**—काय तूं द्रौपदी आहेस?—वाः फारच उत्तम झालें. जी गोष्ट सुयोधनाच्या हातून सिद्धीस गेली नाहीं, ती मी आज शेवटास नेतों.—द्रौपदी, कौरवेश्वर व पांडव ह्यांच्या युद्धानंतर—तूं माझी नाटकशाळा व्हायची, ती ह्या क्षणालाच होणार.—तरी मला वाटलेंच होतें कीं, तूं फार मोठ्या कुलांतली असावीस म्हणून, कारण माझ्यासारख्या श्रेष्ठ धनुर्धरांचें मन एकाद्या क्षुल्लक सैरंध्रीवर कसें बसेल?

**सैरं०**—हे अजून कसे येत नाहींत!—प्राणनाथ भीम महाराज, धांवा हो धांवा.

**कीच०**—द्रौपदी, तुझे यक्षकिन्नर कोण तें मी आतां समजलों; तुझी वेणी कां घातलेली नसते, हें माझ्या ध्यानांत आलें.—द्रौपदी, कौरवांशीं लढून दुःशासनाच्या रक्तानें भिजलेल्या हातांनीं भीम तुझी वेणी घालील असें मनांत देखील आणूं नकोस; माझ्याशीं विलास करण्यापूर्वी माझ्या हातांनीं मला तुझी वेणी घालूंदे.

**सैरं०**—प्राणनाथ भीम महाराज, धांवा हो धांवा.

**कीच०**—द्रौपदी, तूं माझी नाटकशाळा होणार हें ब्रम्हदेवानें तुझ्या व माझ्या ललाटीं स्पष्ट अक्षरांनीं लिहून ठेविलें आहे.—तूं ह्या वेळीं आपखुषीनें माझी प्रियतमा हो, आणि माझा पराक्रम पहा. शहरांत जाऊन, मत्स्यनगरांत गुप्तपणानें राहणाऱ्या पांडवांशीं एकट्यानें युद्ध करून, तुझ्या स्वयंवराचेवेळीं गैरहजर राहण्याच्या माझ्या चुकीची भरपाई म्हणून पांचहि पांडवांचीं शिरें उद्यां सकाळीं—मी—तुझ्या—माझ्या ह्या प्रियतमेच्या—चरणयुगुलांवर अर्पण करीन.

**सैरं०**—दुष्टा, राक्षसा, तुझें शीर ह्या भैरवाचे पायावर अर्पण केलेलें पाहिल्याशिवाय ही द्रौपदी ह्या मदिरांतून बाहेर पडावयाची नाहीं, हें पक्कें समज. [भैरवाचे जवळ जाऊन] भैरव महाराज, ह्या पाप्याचा बळी घेऊन ह्या दीन गाईला ह्या संकटांतून सोडवा.

कीच०—द्रौपदी, माझ्या ताब्यांतून तुला सोडविण्याची ह्या भैरवाची काय प्राज्ञा आहे!–प्यारी, माझ्या शक्तीचा आतांच चमत्कार पहावयाचा असल्यास, मला आज्ञा कर; डाव्या हातानें ह्याची शेंडी धरतों, आणि उजव्या हातानें एक बुक्की ह्याच्या छाताडावर मारून ह्याच्या धडाचें चूर्ण करून, निराधार झालेलें ह्या भैरवाचें शीर तुझ्या पायावर वाहतों.

सैरं०—चांडाळा–नराधमा–पाप्या–राक्षसा–

कीच०—द्रौपदी, कोणाला ह्या शिव्या देत आहेस? तोंड संभाळून बोल, नाहीं तर—

सैरं०—[भैरवाचे एका बाजूस उभी राहून] दुष्टा, नाहीं तर काय रे!–ह्या ठिकाणीं कोणी जरी माझ्या मदतीला आलें नाहीं तरी मी एकटी तुला शिक्षा करण्यास समर्थ आहें.

कीच०—[भैरवाचे दुसऱ्या बाजूस चवताळून उभा राहून] द्रौपदी, बऱ्या बोलानें माझ्या म्हणण्यास रुकार दे—

सैरं०—भीम महाराज, धांवा हो धांवा, प्राणनाथ भीम महाराज—

कीच०—बोलाव, अर्जुनाला बोलाव--भीमाला बोलाव,--अर्जुन येऊं दे, भीम येऊं दे, शक्तीबद्दलच्या सर्व पांडवांच्या घमेंडीबरोबरच पातिव्रत्याच्या तुझ्या वल्गना लयाला नेण्याची वेळ जवळ आली म्हणून समज.

सैरं०—धांवा हो धांवा, प्राणनाथ भीम महाराज धांवा.

कीच०—द्रौपदी, मत्स्यभेद करणारा व हिमाचलावर तपश्चर्या करून प्रत्यक्ष शंकरापासून अस्त्रविद्या शिकून आलेला तो सव्यसाची अर्जुन जरी ह्य क्षणीं येथें येऊन ठाकला, तरी एक लाथेसरशी त्याचा प्राण घेऊन, त्याच्या बाणांच्या भात्याला तुझ्या व माझ्या ह्या ठिकाणच्या विलासशय्येवरील उशी केल्यावांचून मी राहणार नाहीं. सहस्रनागांची शक्ति असलेला तुझा तो आवडता भीम जरी येथें ह्या वेळीं प्रगट झाला, तरी त्या घमेंडखोराच्या रक्तानें भिजलेल्या माझ्या ह्या हातांनीं तुझ्या चोळीची गांठ सोडल्यावांचून मी राहणार नाहीं.--द्रौपदी, माझ्या प्रचंड शक्तीचा तुला प्रत्यय यावा म्हणून एका बुक्कीसरशीं ह्या फत्तराचें

पीठ करून दाखवितों. [ बुक्की भैरवाच्या छातीजवळ नेतो, भैरव एका हातानें कीचकाचें मनगट धरून दुसऱ्या हातानें त्याची मान धरून त्याला पुढें खेचीत आणितो. ]

**भीम०**—कीचका, धुंदुरर्या, तुझी छाती असली तर, ह्या भीमाकडे पहा. बल्लभ म्हणतात तो हा मी भीम म्हणतात तो हा मी--तुझ्या मानगुटीवर बसून तुझ्या नरडीचीं हाडें फोडण्याला तयार आहें. चांडाळा, तुझ्या काय काय प्रतिज्ञा आहेत त्यांचा उच्चार तरी कर पाहूं, एकादा शब्द तुझ्या तोंडून निघतो न निघतों तोंच तुला यमसदनाला पाठवितों.

**कीच०**—[ स्वतःस सोडवून घेऊन ] तूं भैरव ऐस किंवा भीम ऐस, तुझ्याशीं मल्लयुद्ध करायला मी तयार आहें.–तूं जर भीम असलास, तर युद्धांत तुला जिंकतो; आणि तुझ्या छातीवर मी मारलेल्या लाथेनें तुझ्या हृदयांतून निघणाऱ्या रक्तांत भिजलेल्या ह्या प्रतापी हातांनीं द्रौपदीची वेणी बळजोरीनें घालीत असतांना तुझी प्रतिज्ञा अशा रीतीनें शेवटास नेणाऱ्या ह्या कीचकाकडे डोळ्यांतून निघून जाऊं लागलेल्या तुझ्या प्राणांना अखेरीस पहावयास लावतों. चल, मल्लयुद्धास तयार हो.

**भीम०**—[ त्याचा हात धरून त्याला खालीं पाडून उरावर बसून ]—गर्दभा, तूं काय माझ्या बरोबरीचा म्हणून तुझ्याशीं युद्ध करीत बसूं ? एक बुक्की तुझ्या छातीवर मारतों आणि देतों तुला टाकून गिधाडांच्या पुढें.–रत्नप्रभेकडे व विराटाकडे लक्ष देऊन एका अटीवर पाहिजे तर तुला जीवदान देण्याविषयीं धर्मराजाची मला आज्ञा आहे. वनवासांत जयद्रथानें द्रौपदीवर बलात्कार करण्याचा प्रयत्न केला; त्या वेळीं त्याचे तीन पाट काढून गाढवावरून त्याची धिंड काढून, द्रौपदीचा गुलाम असें त्याच्या तोंडून वदवून, मग धर्मराजांनीं त्याला जीवदान दिलें. त्याप्रमाणें सैरंध्रीच्या यक्षकिन्नरांनीं मला गुलाम करून तीन पाट काढून जीवदान दिलें, असें विराटाच्या दरबारांत जाहीर करण्याला जर तूं, नरपशो, तयार असलास, आणि आमचे अज्ञातवासाचे दिवस संपेतोंपर्यंत आमच्याविषयीं मौन व्रत धरावयास जर कबूल

असलास, तर कीचका, रत्नप्रभेकरितां व विराटाकरितां–धर्मराजाच्या आज्ञेनें–तुला जिवंत सोडतों.

सैरं०—कीचका, बायकोच्या सद्‌गुणांमुळें तुझा प्राण वांचला ह्याबद्दल वाईट वाटून घेऊं नकोस.–रत्नप्रभेकरितां तुला जीवदान देण्यास माझी ना नाहीं.

कीच०—जिवंत राहून द्रौपदीचा गुलाम होण्यापेक्षां युद्ध करून जिवंत राहिलों, तर द्रौपदीला माझ्या रंगमहालांत ठेवीन.

भीम०—आपला रंगमहाल आतां गिधाडांच्या वस्तींत.

कीच०—खरा क्षत्रीय असशील तर गदायुद्ध—

भीम०—गदायुद्ध आतां! काय म्हणून गदायुद्ध?–ज्या चिलटाचा चिटकी वाजवून प्राण घ्यावयाचा त्याच्याकरितां कोण गदा आणीत बसतो!–धर्मराज, जित्याची खोड मेल्याशिवाय जावयाची नाहीं.–द्रौपदी, कीचकवधाशिवाय पांडवांना गत्यंतर नसल्यामुळें मी ह्याला आतां यमसदनास पाठवितों. [ छातींत बुक्की मारतो. कीचक मरून पडतो. ] चल, द्रौपदी, ह्या वनांतून शहरांत जाऊं व धर्मराजाचें दर्शन घेऊन पुढें काय करावयाचें तें ठरवूं.

सैरं०—पण प्राणनाथ, आपण येथें केव्हां आलांत, तें अगोदर सांगायचें होतें.

भीम०—कीचकवधासंबंधानें धर्मराजाची शेवटची आज्ञा ऐकून मी वनाकडे आलों. वनांत कोणी निशाचरानें चुकून मला पाहिलें तर दैवी चमत्कारानें कीचक मारला गेला असें त्याला वाटावें म्हणून वनाजवळ येतांच मी भैरवाचें सोंग घेतलें.–इतक्यांत रथांत किरीट वगैरे फेकून देऊन सडसडीत होऊन जंगलांत घाईघाईनें शिरतांना कीचकाला मीं पाहिलें. तेव्हां जलदीनें पुढें येऊन तूं मूर्छित असतांनाच भैरवाला उचलून आंत ठेवून [भैरवाची मूर्ति आंतून आणतो ] ह्याच्या जागीं मी उभा राहिलों, व जीवदानास कीचक सत्पात्र आहे किंवा कसें, ह्यासंबंधानें धर्मराजांनीं सांगितल्याप्रमाणें त्याची परीक्षा

करण्याकरितां तुम्हां दोघांचा संवाद ऐकत होतों. [भैरवाची स्थापना करून] द्रौपदी, ह्या भैरवाला नमस्कार कर. [दोघेहि नमस्कार करतात.] हा प्रसाद ललाटाला लाव. [दोघेहि शेंदूर कपाळाला लावतात.] चल, द्रौपदी, धर्मराजाला ही सर्व हकीकत कळवूं.

[ जातात. ]

समाप्त.



and rapid progress to bigger income is assured by the possession of knowledge beyond the ordinary. Whether you desire to become a Competent Typist or an Expert Shorthand-writer, we can help you to succeed in spare time.

PITMAN'S SHORTHAND
&
TOUCH TYPEWRITING

quickly and efficiently acquired by our specialized method of tuition. Terms to suit the conveniences of all the students.

For full particulars please see,

The Manager, **V. B. PADHYE'S SHORTHAND & TYPEWRITING INSTITUTE,**
Near Thakurdwar Post Office, Bombay No. 2.

---




हिंवताप, मलेरिया वगैरे तापांवर

# कर्णिक—
# —एग्यु मिक्श्चर

मागवा—सर्वत्र मिळतें.

**इन्डोबाम—** सर्व शारीरिक दुःखावर एक घरगुती मलम. वापरून खात्री करा. किंमत ८१० आणे.

**कर्णिक ब्रदर्स—गिरगांव मुंबई.**